[ कथासरित्सागरांतील वत्सराजाचे चरित्राचा
आधार घेऊन रचिलेलें. ]

संगीत

# संताप-शमन

अथवा

# वत्सविलास नाटक

दत्तात्रय अनंत केसकर

यानीं रचिलें.




तें

पुणें येथें "श्रीविठ्ठल" छा० छा०

सन १८९६.

हें पुस्तक

परमपूज्य पितृचरणारविंदीं

ग्रंथकर्त्यानें

अत्यंत नम्रतापूर्वक व पितृभक्तिपुरःसर

अर्पण केलें आहे.

सूचना.—२ ऱ्या अंकाचे शेवटील पदाचे ऐवज ... ीं

नवीन पद.

प्रियदर्शिका—

पद. ( हें काय बरें त्वां केलें ) ही चाल.

करुं काय गडे मी तरि याला ॥ ध्रु० ॥
बहु कष्टानें दर्शन घडलें ॥
मधुर बोल ते कर्णीं पडले ॥
परि वेडें मन तृप्त न झालें ॥
हा पाय निघेना जायाला ॥ करुं काय० ॥

---

तिसऱ्या अंकांतील " सुंदरी धरुं नको मानिं रागा " या पदाचे ठिकाणीं मूळचें असलेलें पद.

राजा—पद—( जबसे कलंदर ) ही चाल.

या मित्रासह रंजन करण्या प्रासादीं मी आलों गे ॥
सुस्वर गायन सखिसह करितां पाहिलि ती नृप-
कन्या गे ॥
गानें तीच्या मोहुनि गेली माझी मति सारी ॥
इतक्यामध्यें एकाएकी आली तुझि स्वारी ॥
तव चरणीं मी लीन सदां गे कोपुं नको भारी ॥
॥ चाल ॥ या माझ्या सुंदरी प्रमादा पदरीं घे
आनंदानें ॥ चुकलों आतां न करी ऐसें आलिंगन
दे प्रेमानें ॥ या मित्रा० ॥ १ ॥

# प्रस्तावना

“ आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्, ”

या कविकुलगुरु कालिदासाच्या उक्त्यनुरूप हें संगीत नाटक मी अत्यल्पमती असतांही माझ्या सुशिक्षित देशबांधवांपुढें मांडण्याचें धाडस केलें आहे. सदर्हु नाटकांतील “वत्सराज” व “प्रियदर्शिका” हीं प्रधान पात्रांचीं नुसतीं नांवें कानीं पडतांच, हें नाटक “श्रीहर्ष कवीच्या” प्रियदर्शिका नाटिकेचें भाषांतर आहे, असें सर्वांचें ठाम मत होण्याचा संभव आहे. तर तसा प्रकार मुळींच नसून. कथासरित्सागरांतील वत्सराजचरित्राचे संविधानकाचा अत्यंत त्रोटक आधार घेऊन नाट्यरचनेस अनुकूल अशी स्थल, काल, रस व पात्रें यांचे वर्णनाची संपूर्ण गद्यपद्यरचना अगदीं स्वतंत्र आहे. हें मी माझ्या अभिज्ञ देशबंधूंस गर्वोक्तीनें मुळींच उद्देशून लिहीत नाहीं. तर उलटी “ तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम् ” अशी माझी स्थिती आहे. या नाटकाचे प्रयोग आज जवळजवळ तीन वर्षे रंगभूमीवर होत असून, कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें सदर्हु पुस्तक मुद्रित न झाल्यामुळें, माझ्या बऱ्याच देशबंधूंची निराशा करावी लागली याचें मनापासून वाईट वाटतें. सुदैवानें तो योग सध्यां जुळून आला यामुळें मी जगन्निय-

त्याचा व देशबंधूंचा फार आभारी आहें. सध्याच्या जनरुचीस अनुसरून या नाटकांतील बहुतेक गाण्यांच्या चाली पार्शी नाटकाच्या पद्धतीवर घालाव्या लागल्या, यामुळें ग्रंथकर्त्याच्या माथीं ग्राम्यतेचा दोष लादतांना माझ्या बंधूंनीं सहृदय व्हावें अशी त्यांस विज्ञप्ति आहे.

ग्रंथकर्त्याच्या दोघां कविमित्रांचीं एक दोन त्यांच्या आवडीचीं पद्यें यांत घेतलीं आहेत, याचा येथें उल्लेख करणें उचित वाटतें.

तसेंच हें नाटक छापण्यासंबंधानें ज्या माझ्या इष्टमित्रांनीं परिश्रम केले त्यांचा ही मी फार आभारी आहें.

शेवटीं माझे परम पूज्य पितृस्नेही व रसिकजनमान्य, रा० सा० ग० श्री० खापर्डे, यांनीं आपला अमूल्य काळ खर्च करून या नाटकाच्या रचनेंत जे उपयुक्त फेरफार केले, व वेळोवेळीं सूचना केल्या व आपल्या अनुपम रसज्ञतेचा लाभ करून दिला, त्या सर्वां बद्दल ग्रंथकर्ता त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

द. अ. के.

पुणें.
ता० १८ आगष्ट, १८९६.

संगीत

# संताप-शमन नाटक.

## अंक पहिला.

---

### नान्दी.

पद ( सांबसुराभरणा ) या चालीवर

वंदन हरचरणा ॥ करितों ॥ संसृतिभयहरणा ॥ ध्रु ॥
मंदाकिनिपवनें ॥ शिरिंच्या ॥ बालचंद्र किरणें ॥ १॥
किन्नरगणगानें ॥ गौरी ॥ बाहुस्पर्शानें ॥
रोमांचित जी हरतनु झाली ॥ रक्षो ती सकलां सुजना ॥
संसृति ॥२ ॥

पद- ( छायानट ) त्रिवट

स्तवित मि त्या घननील मुकुंदा ॥
देवकिनंदानंद सुकंदा ॥ ध्रु० ॥
सेवित कालिंदी सुपुलिंदा ॥

श्रीमुखकमलमरंदमिलिंदा ॥
सनकसनंदन गाती अनुदिन ॥
गोड तुझा महिमा गोविंदा ॥ १ ॥ स्तवित ॥
कुंदरदन अरविंदमुखेंदा ॥
कैटभमुरचाणूरनिकंदा ॥
त्यजुनि सकल निंदामय धंदा ॥
लागो दत्तात्रय तव छंदा ॥ २ ॥ स्तवित ॥

**सूत्रधार.**–( पुढें होऊन ) पुरे, पुरे, सभाजनांचा काल हरण व रसभंग करणारा वृथा परिश्रम कशाला पाहिजे. अरे वा! वर्षाकाल लागतांच जसे राजहंस सहपरिवार मानस सरोवरीं जातात, तसे हे महा रसिकजन आज आमच्या गांधर्वशाळेंत जमले आहेत. वाहवा, काय हा आनंदाचा दिवस, अरे हो! पण ही आमची संगीत शाळा अशी शून्य कां दिसते ? कुशीलवादि मंडळी गेली तरी कोठें ? तर आतां भार्येलाच हांक मारली पाहिजे. ( पडद्या कडे पाहून ) मारिषा, आंत जाऊन प्रियेला असं सांगकीं,

साकी

रसिक महाजन अभिनव नाटक ॥ बघण्याउत्सुक असती ॥ कृष्णसारमृग समपंडित जन ॥ गानोत्सुक हे दिसती ॥ यास्तव हे चतुरे ॥ पात्रें नटवुनि आण वरें ॥ १ ॥

**नटी**—( प्रवेशकरिते ) प्राणनाथ काय आज्ञा आहे ?

**सूत्रधार**—प्रिये, कथासरित्सागरांतील वत्सराजाच्या चरित्राचा आधार घेऊन माझ्या एका मित्रानें अभिनव नाटकाची रचना केली आहे. त्याचा प्रयोग आज या चंद्रिकोत्सवांत या सभाजनापुढें मी करून दाखविणार आहें.

**नटी**—प्राणनाथ, समजलें. सोमवंशांतील अर्जुनापासून सातवा सार्वभौमराजा वत्सराज याचा कथाभाग असल्यावर दुर्यशाची चिंता आपल्याला मुळींच नको.

**सूत्र०**—हें काय विचारावं प्रिये ?

पद. ( यमनकल्याण. ) त्रिवट.

**अभिनव मोहक नाटक असुनी ॥**
**रसिक सभाही गुणग्राहिणी ॥ ध्रु० ॥**
**वत्सपतिकथा सकल जनाला ॥**
**ठाउक आहे अतिशय विमला ॥**
**सर्व योग हे या समयाला ॥**
**मम दैवानें जाति मिळोनी ॥ १ ॥**

**नटी**—प्राणनाथ तें सर्व खरं. पण त्याच्या चरित्राचे कथाभाग पुष्कळ आहेत. त्यांपैकीं आपण कोणत्या चरित्राचा भाग इथें करून दाखविणार ?

**सूत्रधार**—प्रिये ऐक.

पद (अष्टमूर्ति.) या चालीवर

सोमवंशिंचा अतुलप्रतापी वत्सराज नृपती ॥ धीर ललित विख्याताचि असतां विमल ज्याचि किर्ती ॥ ध्रु० ॥ विंध्यकेतुची सुता तयाला प्राप्त कशी झाली ॥ रम्य कथाही दत्तात्रयकविपटुनें जी लिहिली ॥ करुणाप्राणित शृंगाराची शोभा ज्या आली ॥ ऐसें अभिनव नाटक दावुनि करुं गे जनतृप्ती ॥ १ ॥

नटी—प्राणनाथ, फार चांगलं. त्यांतूनही सध्याचा हा ऋतुकाल आपणाला अनुकूलच आहे.

पद. (सुटला पितृ दिशेचा.) या चालीवर.

आला शरत्काल चांगला ॥
होतो हर्ष मनीं बहु मजला ॥
हा चंद्र पहा वर्षतो विमल कौमुदिला ॥
जणु धवल वसन नेसवी दिशासुंदरिला ॥ १ ॥
फुलल्या मालति शेफालिका ॥
बंधुक केतकि कल्हारिका ॥
किति काशकुसुमगंध हा सुखवि घ्राणाला ॥
अति मुदित मनें कामिनी करि विलासाला ॥ २ ॥

सूत्र०—प्रिये खरंच आहे. हें पहा !

पद ( वीरा भ्रमरा. ) ही चाल.

गौरचंद्रकिरणांनीं रजनी अमृत जणु वर्षती ॥
अथवा कर्पूरा प्रसवती ॥
सप्तच्छद-पुंडरीक-कुमुदिनि-काशकुसुम-केसरीं ॥
झाली धवलित दिक्सुंदरी ॥
हंस क्रौंच मिथुनांकित सरिता पुलिनें किति शोभती ।
जलाशय स्वादुविमल भासती ॥
सकल जगाला शरत्काल हा सुखदायक जाहला ॥
मालतिपरिमल हा सूटला ॥ १ ॥

नटी —प्राणनाथ ! तसंच हें पाहिलंत का ?

पद ( स्फटिकाचे हे ) या चालीवर.

श्वेत पद्म शिरिं छत्र धरोनी । शरद्भूपहा प्रविष्ट होतो ॥ ध्रु० ॥
मधुप वंदिजन मत्त होउनी मंजुलशब्दें ज्यास वर्णितो ॥
पद्मिनिगण हा वैभव ज्याचें पाहुनि सस्मित हास्य करितो ॥
ललितधीरहा राजहंस जणु विजयी होउनि उत्सव करितो ॥ १ ॥

( पडद्यांत ) शाबास ! आर्यके शाबास ! !

श्लोक. ( मालिनी )

चतुरुदधि समंता भूमि हा भूप पाळी ॥

गुणललित विलासी शत्रुतें जो निमाली ॥
अतुल सुयश ज्याचें ठाउकें या जगाला ॥
उदयन नृपती हा कोण वर्णी न याला ॥ १ ॥

नटी—( घाबरून ) अगबाई, हा कोण बरं आपल्य मेघासारख्या मत्त व गंभीर शब्दानें मला शाबासकी दे आहे ?

सूत्र०—हं समजलों. हा वत्सराजाचा सेनापती यौगंधरायण विंध्यकेतु राजाचा पराभव करून दोन राजकन्यकांसह विजयश्रीनें प्रफुल्लित होत्साता इकडेच येत आहे. तूं केलेल्या शरत्कालवर्णनास वत्सराजाचें वर्णन समजून त्यानं तुला ही शाबासकी दिली. हा मदोन्मत्त झाला आहे तर याच्या दृष्टीआड निघून जाऊं.

( जातात. )

---

## प्रवेश १ ला.

( नंतर यौगंधरायण व विजयसेन, प्रियदर्शिका व पत्रलेखा यांसह येतात. )

यौगंध०—शाबास ! आर्यके शाबास ! !

( " चतुरुदधिसमंता " हें पुन्हां ह्मणतो )

आज मी केवढा रणसंग्राम केला पहा—

पद. ( वायुनंदन रदन करकर. ) ही चाल.

वायुनंदन करुनि कंदन मारि कुंदुनि कौरवातें ॥ तेंवि अजि मी विंध्यकेतू धाडिला तो यमपुरीतें ॥ ॥ ध्रु० ॥ गडड गर्जुनि मेघ जैसें भेदिती नग अशनिपातें ॥ मोडती तरु कडड करुनी थोर झंझा घोरवातें ॥ दुमदुमध्वानि दुंदुभींचा अजुनि चुंबी अंबरातें ॥ १ ॥

विजयसेन—सेनापते आपण ह्मणतां तें यथार्थ आहे कारण—

पद. ( राग—अरब्बी ).

शक्रापरि नृप हा बलनिधि बंधू दीनांचा ॥ बलनिधि ॥ ध्रु० ॥ धनुर्वीर विजयी समरीं शास्ता रिपुचमुचा ॥ समरीं ॥ ऐकुनि यश ज्याचें डोले राणा अमरांचा ॥ डोले ॥ तत्सैनिक तुम्ही गुहसम विक्रम बहु तुमचा ॥ गुहसम ॥ चाल ॥ राजविजयलक्ष्मी या अरिच्या घेउनियां आली ॥ स्वामीचरणा न्यायाला ॥ स्वामी ॥ १ ॥

यौगंध—विजयसेन ! हा महाराजांच्याच चरणांचा प्रताप. नाहींतर विंध्यकेतु काय सामान्य वीर होता ? पहा—

पद. राग—( शंकरा भरण )

समरगंभीर अति धीर वीरें पहा ॥
चंडकोदंडसह युद्ध केलें ॥
मत्तमातंगरगरंगपारंगता दावुनी सुर नभीं
शांतवीले ॥
किती थोर तो वीर तो शूर कर्मा ॥
वर्णवेना तया प्रथितनामा ॥ कितीथोर० ॥

**विजय०**—सेनापते आपण ह्मणतां त्या प्रमाणेच तो शूर होता खरा!

**यौगंध०**—असो! आतां या श्री आणि सरस्वती, महाराजांच्या चरणीं अर्पण केल्या ह्मणजे आपली स्वामिसेवा संपली.

**प्रियदर्शिका**—हर हर! देवा!! काय आतां मला हे राजाकडे नजराणा ह्मणून का घेऊन जाणार!!!.

पद. ( कुइसुनो मेरी फरियाद. ) ही चाल.

हतभागी मी ठरलें ॥ ध्रु० ॥
मम दुर्दैवानें परदासी बनलें ॥
मरण आतां देइं देवा जन्मा कां आलें ॥
हाय! हाय! हाय! हाय!! ॥
हतभागी० ॥
ममतात जननिला बहुतचि शिणवीलें ॥

**राजकुलिंच्या वैभवाला आतां मी मुकलें ॥**
**हाय! हाय! हाय! हाय!! ॥**
**हतभागी० ॥**

**पत्रलेखा**—सखे असा शोक करूं नकोस. मनाला कांहीं तरी धीर दिला पाहिजे.

**प्रिय०**—पत्रलेखे मी धीर तरी कसा धरूं सांग बरं? कारण, बाबांच्या अत्यंत स्नेहामुळें ज्यांनीं माझं पोटच्या मुली प्रमाणं पालन केलं त्या विंध्यकेतूची परचक्रानं कशी बाई दशा केली!

**पत्र०**—खरंच गडे! तुझा स्वयंवर करण्याचा महाराजांचा विचार होता तोंच हा प्रसंग ओढवला!!

**प्रिय०**— अंजनीगीत.

**हा ताता! हा माते!! कैसें ॥**
**मजवरि संकट आलें ऐसें ॥**
**माझी आतां धडगत न दिसे ॥**
**शरण कुणा जाऊं ॥**

**पत्र०**—( आठवून ) खरंच पण गडे! ज्याकडेस हे आपल्याला नेत आहेत तो वत्सराजा सार्वभौम पृथ्वीपति असून नळ, दिलीप, रघु, यांच्या सारखा गुणसंपन्न असल्याची कीर्ती सर्व जगाला विश्रुत आहेच व त्याचे सेनापती ही शूर, नम्र व विजयशाली असून दयाळू आहेत.

प्रिय०——बरं मग ह्मणतेस तरी काय?

पत्र०—ह्मणून ह्मणत्यें कीं उगीच काळजी करूं नकोस. कदाचित् सुदैवानें तूं त्याचीच पट्टराणी होशील. मला वाटतं स्वयंवरांत देखील तूं त्यालाच माळ घातली असतीस.

प्रिय०-पत्रलेखे, मी एकदां त्या राजगृहीं दास्यत्वांत जाऊन पडलें, म्हणजे माझा सारा जन्म त्यांतच! मग गडे मला सुखाची आशा उगीच कशाला लाऊन ठेवतेस?

पत्र०-गडे वीज मेघाला भेटल्या वांचून राहिली आहे कां?

यौगंध०——विजयसेन या कन्या राजकुलांतल्या असल्या मुळें फार लज्जावती दिसतात. मी वारंवार विचारून पाहिलें परंतु व्यर्थ! तेव्हां तूं तरी त्यांचें नांव गांव विचारून पहा बरें!

विजय०-( आपल्याशीं ) या स्वारीची वृत्ती चंचल दिसते. निदान मुक्ताफळें तरी कर्णीं पडावीं असा यांचा मनोदय दिसतो. ( उघड ) आर्या यौगंधरायणा! मला वाटतं कीं यां पैकीं जी अतिनाजुक आहे ती राजकन्या असून दुसरी तिची सखी असावी. या विनयशील कन्यकांचं नाम कुल विचारून यांचा उपमर्द कशाला करावा?

यौगंध०- ( आपल्याशीं ) हे राजश्री वेदांती दिस-

तात. तर आपणच पुन्हां यांनां विचारून पहावें ( उघड ) हे विनयवतींनों! तुम्ही आपलं नाम कुल काय हें आतां तरी सांगाल काय ?

**प्रिय०** — पत्रलेखे! आतां माझा मान तूंच राख बाई !

**पत्र०**— ( मनांत ) आतां कसं करावं? जर सखीचा नामकुल वृत्तांत याला सांगावा तर हिला दुप्पट दुःख होईल. तर याची कांहीं युक्तीनेंच समजूत केली पाहिजे. ( उघड ) सेनापतीमहाराज!—

**यौगंध०**—( आनंदानें ) वाहवा! धन्य आहें मी!! आर्ये बोल.

**पत्र०**—या भर्तृदारिकेचा नामकुलवृत्तांत मला मुळीं-च ठाऊक नाहीं. हिच्या पित्याच्या घरीं मी नुकतीच से-वेला राहिलें होतें, तोंच आपण संग्राम करून आम्हाला इकडे आणलंत. शोकामुळें माझ्या सखीला मुळींच बोलवत नाहीं.

**विजय०**—खरेंच आहे. त्यांचें वय कोमल असून प्रसंग ही मोठाच गुदरला. तरी पण तुम्ही मुळींच चिंता करूं नका कारण आमचे महाराज वत्सराज फार दयाळू आहेत.

**पत्र०**— आर्या तुझें कल्याण होवो!

**यौगंध०**—( मनांत ) हीं जरी आपल्याला दासी

ह्मणवून घेते तथापि दोघीही एकाच कुळांतल्या असाव्यात असा माझा तर्क आहे. हिची सखी मात्र शोकामुळें गळून गेली आहे. वाहवा ! ज्या रूपवती असतात त्या दुःखांत देखील किती सुंदर दिसतात ! !

विजय०—मित्रा यौगंधरायणा ! आपण बोलत बोलत कौशाम्बीच्या अगदीं राजमार्गांत आलों ! !

यौगंध०—( पाहून ) खरेंच ! वाहवा काय ही कौशाम्बीची शोभा—

पद. ( कल्पतरू हे जिकडे तिकडे. ) ही चाल.

**जिकडे तिकडे उंच मंदिरें सौध विशाल हे किती ॥ सुवर्णमंडित उंच गोपुरें जणु स्वर्गा चुंबिती ॥ धृ० ॥ वेत्रवतीचीं कमलवनें हीं नयनांतें सुखविती ॥ वातायन प्रांतांत बैसती ललना या सुदती ॥ चाल ॥ या उपवनपंक्ती हर्षविती दृष्टिला ॥ या राजमार्गि हा विटनटगण चालला ॥ हा गणिकासदनीं कामोत्सव वाढला ॥ चाल ॥ पाहुनि कौशाम्बीची शोभा लोचन मम दीपले ॥ महेंद्राच्या अमरावतिचें वैभव जणुं कोंदलें ॥ १ ॥**

विजय०—चला तर आतां महाराजांच्या दर्शनाला जाऊं—

( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( सिंहासनारूढ झालेला राजा व विदूषक प्रवेश करितात. )

वैतालिक—( पडद्यांत ) जयजयकार महाराज !

## चूर्णिका.

अतिचंड मार्तंडकिरण शिरिं साहुनी उत्तुंड तरुवर थंड छायिं अंडजमृगपांथगण शांतवि जैसा ॥ अतिचंड कोदंड धनु गांडिवसम धरुनि उद्दंड. रिपुकुलांसि उदंड दंडुनि ब्रह्मांड धुंडुनि दानवकरिगंडकंडु शमविसि वत्सराजा ॥ शशिकुलमंडलमंडन रिपुखंडन करगंड मंडित तुंडा शुंडानन सुंदरि पुंडरीकवसना उभय मिळुनि तवगृहिं नांदति वत्सराजा ॥ भर्ता समुद्रमालामेखलाभूचा हर्ता शचिसम प्रद्योततनयेचा तूंचिरे तूंची वत्सराजा ॥

विदूषक—मित्रा या रांडलेक वैतालिकानें तुला प्रद्योततनयेचें हरण करणारा असं विशेषण देऊन खासा चोर ठरवलं बरं ! !

राजा—सख्या या वैतालिकानं प्रद्योतराजाच्या नांवाचें मला स्मरण देऊन किती तरी गतचरित्राचा भाग चित्रपटासारखा मजपुढें मांडला आहे. पहा—

पद—( ज्यावरि मी विश्वास. ) ही चाल.

कारागृहिं मी जरि बहु काला ॥
घालविलें तरि खेद न आला ॥
प्रद्योताची प्रियकर बाला ॥
वश झाली मजला ॥ कारागृहि० ॥ १ ॥
सचिवानीं नच नीतिस त्यजिलें ॥
प्रजाप्रेम तें द्विगुणित झालें ॥
यौगंधानें मज सोडविलें ॥
रणकर्मा करुनी ॥ कारा० ॥ २ ॥

विदू०—मित्रा तर मग एकूण प्रद्योताच्या कारागृहानें तुजवर उलट मोठे उपकार केले ह्मणावयाचे.

राजा—अरे हें अगदीं उघडच आहे.

पद—( राग सोहनी ताल त्रिवट. )

मधुमधुर वचन बोलोनीं ॥
रंजवि मन माझें जी बंधनिं ॥ मधुर ॥ धृ० ॥
प्रद्योताची दुहिता जी मज कारागृहिं झाली
वशिनी ॥ प्राप्त झालि शेवटिं ती मजला
वासवदत्ता रमणी ॥ मधुर ॥ १ ॥

मित्रा! तें राहूंदे आतां, आपला मांडलिक राजा विंध्याकेतु हा वार्षिक खंडणी देईना ह्मणून मी यौगंधरायण

सेनापतीला सैन्य देऊन त्याच्याकडे पाठविला आहे. काय करावं ? पहा—

पद ( करम्‌कर मेरे हाल ) ही चाल

बहूकाळ गेला तया जाउनी ॥
वसे थोर चिंता हि माझ्या मनीं ॥ बहू० ॥ धृ० ॥
जयश्री तयाला वरी वानवा ॥
नये झोंप मातें सुखें माधवा ॥ बहू० ॥ १ ॥

विदू०—मित्रा! महेंद्र देखील समरांत तुजवर सर्व भार ठेवतो मग विंध्याकेतूची ती काय कथा ?

( प्रतिहारी प्रवेश करिते. )

प्रतिहारी—महाराजांचा विजय असो! विंध्यकेतूचा पराभव करून त्याच्या श्री आणि सरस्वतीच कीं काय अशा दोन कन्यासह यौगंधरायण व विजयसेन विजयी होऊन आले आहेत. यावर महाराजांची मर्जी—

राजा- ( आनंदानें तिच्या अंगावर शेला फेंकून देतो. ) वाहवा! जा जा!! त्यानां घेऊन ये.

प्रति०—आज्ञा महाराज!

( निघून जाते व यौगंधरायण विजयसेन प्रियदर्शिका व पत्रलेखा यां सह प्रवेश करिते )

चलावं, महाराज आपली गांठ घेण्याला अति उत्सुक आहेत.

विजय०- यौगंधरायणा हे पहा चारी वर्णांचे शास्ते आपले महाराज धर्मासनावर विराजमान आहेत .

पद–( शंकराभण. )

किती थोर गंभीर हा भूप दिसतो ॥
अंतरात्मा पहा शांत करितो ॥ ध्रु० ॥
सप्तद्वीपांकिता भूमितें शासुनी चक्रवर्ती महा-
नाम धरितो ॥ पुण्यकीर्ती महाबाहु आखंडला
तुल्य हा लोचना हर्ष देतो ॥ किती० ॥ १ ॥

यौगंध०–अहो हा धर्मात्मा तसाच आहे.

पद–( शंकराभरण. )

सुगुणसिंधू पहा इंदुमुख हा दिसे ॥ उदय
गिरिवरि रविच उदयलासे ॥ ध्रु० ॥
चंड कोदंड हा गांडिवासम धरी ॥
दंडिउद्दंडजनकंडुभासे ॥
सकलश्रीमंतसांमतसीमंतपर्यंतचुंबीतपद
हा सुविलसे ॥ सुगुण० ॥ १ ॥

( पुढें होऊन ) विंध्यकेतुचें शासन करून त्याचं सर्व-स्वरूपी या दोन राजकन्या उपायनभूत आणणारा यौगंध-रायण महाराजांचे चरणीं प्रणिपात करतों ( यौगंधरायण व विजयसेन खालीं वांकतात )

राजा- ( सिंहासनाखालीं उतरून ) यौगंधरायणा !

पद--( राग हम्मीर ) त्रिवट

विजय तुझा मज बहु सुखवी ॥
विक्रम तव हा पाहुनि अंतरिं तोष मला होई ॥ धृ० ॥
क्रौंच विदीर्ण गुहें केलें ॥ अरुणें तिमिरा लोपविलें ॥
त्या परि तूं रिपुसी हरिलें ॥ ममभुजबल या अवनि-
तलावरि रक्षियलें पाही ॥ विजय० ॥ १ ॥

विजयसेन तुमचेंही स्वागत असो तुम्ही उभयतां ही मला आलिंनन द्या (दोघे ही सादर आलिंगन देतात.)

( राजा सिंहासनावर बसतो ) बरं पण यौगंधरायणा विशाखाच्या दोन नक्षत्रां प्रमाणें या शोभणाऱ्या कोण बरं.

विदू०—नक्षत्रांचा अधिपति जो चंद्र तो तूंच या भूलोकीं अवतरला आहेस ह्मणून तुला पाहण्याकरितां त्या आल्या आहेत असं वाटतं.

यौगंध०—महाराज ! जिच्या अंगावर वस्त्राभरणें अधिक आहेत अशी ही राजकन्या आहे व दुसरी ही तिची सखी आहे. अगोदरच ही सुकुमार असून बंधुवियोगदुःखानें विशेष म्लान झाली आहे.

राजा—( प्रियदर्शिकेस पाहून ) खरेंच ही—

पद. ( शैवालें युक्त जैसें ) ही चाल

विनयवती शोकभारें खिन्न बहू दीसते ॥

जणु दुसरी जानकी ही वनवासी वाटते ॥
दुःखार्ता करुणमूर्ती द्रव हृदया आणिते ॥
लावण्यें श्रीरतीला मागें ही सारिते ॥ १ ॥

**प्रिय०**—अगबाई! वर्णनावरून हृदयांत जें चि: काढिलं होतं त्यापेक्षां हा राजा शतपट सुंदर दिसतो.

पद. ( शादमा नजर पडा. ) या चालीवर

पाहुनी नृपास या मनोहरा ॥
मोह अंतरीं पडे मला खरा ॥
ललितधीर थोरवीर रूपसागरा ॥
किती बघूं नरेश्वरा ॥ मदनसुंदरा ॥ पा० ॥

**पत्र०**—माझ्या सखीनं याचं जें वर्णन केलं तें अगदीं यथार्थ आहे.

**प्रिय०**—गडे हें सर्व जरी खरं आहे तरी त्याचा मला काय उपयोग?

**विदू०**—मित्रा या प्राप्त झालेल्या नववधूशीं एकदाचें लग्न उरकून टाक कसा! बाकी लड्डूंची तयारी आमच्या-कडेस लागली!

**राजा**—अहो ज्या जात्याच सुंदर असतात त्या दुःखांत देखील किती मनोहर दिसतात पहा—

पद. ( तस्करा हातीं. ) ही चाल.

रक्त किती हीचें ॥ हीचें मुख झालें ॥
अधर ही शुष्क पहा पडले ॥ नेत्रीं हे बिंदू ॥
बिंदु फार आले ॥ मुखाहुनि खालीं ओघळले ॥
कमल जसें ओलें ॥ ओलें बहु झालें ॥
द्वानें सिंचित जें केलें ॥ रक्त ॥ १ ॥

हे सुंदरीनों—

पद ( लते खरितूं ) ही चाल.

अतां धरूं नका मनिं भीती ॥ सुंदरिनों हें स्व-
सदन मानुनि इथें करावी सुखवसती ॥
॥ ध्रु० ॥ लाजविलें समरांगणि पडुनी ॥
विंध्य नृपें आम्हां सकलां ॥ जय साधिय-
ला ॥ आम्हां वरती ॥ सुंदरिनों हें स्वसदन
मानुनि ० ॥

पत्र०—सखे पाहिलंस ना, हा राजा किती चतुर व गुणवान आहे तो?

प्रिय०— होय खरंच गडे.

पद०—( आज श्याम मोहेलिनो. ) ही चाल

वदनचंद्र जणु याचा मधुर सुधा वर्षितसे ॥
गुण जैसे रूप तसें शोभा या देत असे ॥

॥ ध्रु० ॥ उदयाचलिं रवि तैसा सिंहासनिं हा विलसे ॥ चुंबकमणिसम माझें मन हरुनी नेत असे ॥ वदन० ॥ १ ॥

राजा०— यौगंधरायणा विजयसेनानें आपल्या नांवाप्रमाणें कीर्ति केली हें पाहून मला फार संतोष होतो.

योगंध०—महाराज विजयसेनानें मला सहाय्य केलें म्हणूनच जय मिळाला, नाहीं तर विंध्यकेतु कांहीं सामान्य वीर नव्हता. पहा—

पद०--( शशिकुल भूषण. ) हीचाल.—

भयंकर रण जें अम्हि केलें ॥ त्याच्या तुल्य न कधि झालें ॥ ध्रु० ॥ घनसम गर्जति कीं दंती ॥ रथावरि रथ ते आपटती ॥ धनुचे टणत्कार होती ॥ भीषण शंख घोष घुमती ॥ चाल ॥ विंध्यकेतु तो चमुजलधीचा और्वानल गमला ॥ जयाची विक्रमता अतुला ॥ १ ॥

विजय०—हा सर्व स्वामिचरणांचाच प्रताप! कारण—

दिंडी

विजयि होऊनियां दास जरी आला ॥
पात्र नाहीं तो स्वामिगौरवाला ॥
सूर्यकांता जें तेज प्रखर येतें ॥
त्या न नैसर्गिक परी रवीचें तें ॥ १ ॥

विदु०--मित्रा तुला या राजकन्येच्या नादांत कांहीं-मुद्धां भान राहिलं नाहीं. हा पाहिलास का भगवान् सहस्रश्मी नभोमंडलाच्या मध्यभागीं आला—

राजा--खरंच मित्रा हा दुसरा चमत्कार पहा—

पद. (राग—सारंग)

हंसांचा गण हा कमलांच्या पत्रच्छायिं बसला ॥
छत्रापरि शिखि हा रवितापें धरितो शिरिं बर्हाला ॥
पारावत पंक्ती त्रस्त अती सेविति गृहवापीला ॥
रोमंथा करिती हरिण पहा बैसुनि तरु छायेला ॥
हंसां० ॥ ( जातात. )

प्रथमांक समाप्त.

# अंक २ रा.

( चतुरिका व कुसुमावती प्रवेश करितात. )

**चतुरिका**—कायग कुसुमावती एवढ्या घाइघाईनें चाललीस तरी कुणीकडे ?

**कुसुमावती**—अग आज अर्धा महिना होत आला महाराजांची वृत्ती, बाई फारच पालटली आहे.

**चतु०**—अग असं झालं तरी काय त्यांना ?

**कुसु०**—चतुरिके यौगंधरायणानें विजय संपादून जिचें हरण करून आणलें त्या विंध्यकेतूच्या कन्येनें तर बाई त्यांना वेड लावलें आहे. अलीकडे राज्यकारभार तर सोडूनच दिला पण आहार नको, विहार नको, मृगया नको, अहोरात्र तिचें ध्यान करीत असतात.

**चतु०**—अग पण हें राणी वासवदत्तेला कळलें असेलच.

**कुसु०**—अग तर. त्या राजकन्येला राजसभेंत आणल्यावर तिला पाहून महाराजांची झालेली चंचलवृत्ती उभतांचें चोरून प्रेमानें पाहणें, सलज्ज हास्य करणें वगैरे सर्व वृत्तांत प्रतिहारिकेनें येऊन राणीला सांगितला. तेव्हांपासून त्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटतें आहे ! या साऱ्या

अर्धमासांत त्यांनीं देवी वासवदत्तेच्या मंदिरांत पाय ठेवला असेल, तर शपथ. तरुण कामीजनांची प्रीति त्यांच्या डोळ्यांत मात्र असते, हृदयांत अगदीं नसते, ही ह्मण अगदीं खरी आहे. यामुळें ती विचारी झुरणीस लागली आहे.

चतु०—अग, सवतिमत्सर हा स्त्रियांचा उपजत स्वभावच आहे. गडे, बरं मग पुढें ?

कुसु०—तेव्हां, कुलदेवतांचें आराधन केलें असतां, महाराजांच्या वृत्तींत बदल पडेल ह्मणून राणीनं अपर्णाव्रत धरलें होतें, त्याची सांगता आज आहे. व त्याकरितां माधवभडजीला भोजनाचें निमंत्रण सांगून ये असें राणीसाहेब ह्मणाल्या. तेव्हां त्यांच्या मी शोधांत आहें.

चतु०—सखे, तूं राणीसाहेबांच्या जवळ असल्या कारणानें तुला सर्व अंतस्थ वृत्तांत माहित होतो. बरं तर, मीही नित्याप्रमाणें राणीच्या पूजेकरितां पुष्करिणींतलीं नीळकमळें व दूर्वा तोडून घेऊन जातें.

( चतुरिका जाते )

कुसु०—आतां त्या द्वाड भटाची कोठें बरें गांठ पडेल ? बहुतकरून तो राजवाड्याच्या मधल्या चौकांत अजगरासारखा घोरत पडला असेल. त्या भटाचा भोजन आणि निद्रा हाच कायतो धंदा. [पुढें जाते व पाहून दचकते.] अहा हेंच तें ध्यान ! कसा एखाद्या स्वच्छंदी हरणासारखा अ-

स्ताव्यस्त हातपाय पसरून घोरत पडला आहे !! [ हाल-वून ] माधवभटजी, अहो माधवभटजी, उठा. उठा लवकर.

विदू०—[ आळे पिळे देऊन चावळतो ] मित्रा, तूंच आपल्या प्रियकरणीला शोध जा. मला आपला झोंप घेऊं दे कसा !

कुसु०—[ मनांत ] ह्या भोळ्या भटानें झोंपेंत चावळून महाराजांचें रहस्य फोडलें. [ उघड ] भटजी, उठा उठा.

विदू०—[ किंचित् जागा होऊन ] कांग चेटी, अगदीं पहांटेसच आलीस ? कांहीं मोदकबिदक आहेत कीं काय ?

कुसु०—[ मनांत ] ही थट्टेची वेळ बरी आहे. [ उघड ] भटजी मोदक नाहींत नी कांहीं नाहीं. तुम्ही आतां झोंपेंत चावळून महाराजांचें रहस्य फोडलेंत तेंच काढून घेण्याकरितां मी राणीकडून आलें होतें.

विदू०—[ आपल्याशीं ] हरहर ! झोपेंत भान न राहतां चावळल्यामुळें असा प्रमाद घडला. [ उघड रागानें ] कायग ए बटकीचे पोरी ! पारधी जसें सशाला जाळ्यांतून हुसकावून लावतात तसें तूं मला धुसकून धुसकून उठविलेंस तर थांब या माझ्या दंडकाष्टानें तुझी कंबर मोडून टाकतों. [ रागानें काठीं उगारतो. ]

कुसु०---भडजी, मी गरीब; मजवर कां तुमचं शस्त्र? ( एकीकडे ) मेल्याच्या हातावर जसं सदा नक्षत्रच पडल्यू. [ उघड ] भडजी मी तुमची थट्टा केली. हें पहा राणीनें आज तुम्हाला भोजनब्राह्मण सांगितलं आहे. मोदकांची चंगळ नी वर दक्षिणा. मग तर यालना?

विदू०--[ मोठ्यानें हंसून ] अग रांडीचे पोरी, मग अगोदर काय झालं होतं असं न ह्मणायला? हें पहा वासवदत्तेला सांग कीं माझें सध्याचें अजीर्ण जर रिचलें तर मी येईन. पण थांबहो! नाहीं. येईनच ह्मणून सांग.

[ आपल्याशीं ] आयती दक्षिणा तरी कां सोडा?

कुसु०—बरं.

[ कुसु० जाते. ]

विदू०—[ कष्टानें उभा राहून, ]

शिव! शिव!! शिव!!!

कटाव.

या मित्राच्या नादिं लागुनी ॥
गेलों मी बहु कंटाळूनी ॥
माझि दया त्याला कोठूनी ॥
विंध्यकेतुची कन्या कोणी ॥
जीस आणिलें यानें जिंकुनि ॥

दृष्टिस ती पडल्या पासूनी ॥
गेला राजा वेडा होउनि ॥
तिजसाठीं हा भटकत फिरतो ॥
अपणासंगें मला हि नेतो ॥
घोडीमागुनि शिंगरू जैसें ॥
ओढुनि नेतो मला हि तैसें ॥
प्रमदवनांतुनि क्रीडाशैलीं ॥
क्रीडाशैलावरुनी खालीं ॥
खालुनि वरती वरतुनि खालीं ॥
ऐसें करुनी तनु ही शिणली ॥
माझ्या आतां बोकांडीची ॥
पिशाचबाधा जाते कैची ॥
अर्ध मास गेला होवोनी ॥
झोंप न ठाऊक मजला नयनीं ॥
प्राण चालला माझा निघुनी ॥
॥ चाल ॥ हा राजा वेडा झाला ॥
भलतिच्याच नादीं पडला ॥ १ ॥

असो, माझा मित्र इकडे येईपर्यंत या थंडगार चंद्रकांतमण्याच्या फरशीवर बसून क्षणभर विश्रांती घ्यावी.

( राजा प्रवेश करितो. )

राजा—सर्वरात्रभर त्या सुंदरीच्या विरहानें झोंप

न लागल्यामुळें मला जो ताप झाला होता, तो या प्रभातकालच्या मंद मारुतानें संपूर्ण नाहींसा केला. अहाहा! किती शांत वेळ आहे ही!

पद. ( किती तरी पहांटेची ) ही चाल.

**सरूनियां रजनिकाल सुखदायक अरुणोदय झाला ।ध्रु.**
**मंद मंद अति कोमल ॥**
**वायु सुटे हा शीतल ॥ कमलगर्भशयन मृदुल ॥**
**त्यजुनि भ्रमर ऊठती ॥ १ ॥**
**तारागण नष्ट होति ॥**
**कुमुदिनि निज कोश मिटिति ॥ चिरविरहिणिगंडकांति ॥ येत शशी मंडला ॥ २ ॥**
**जणु भार्या इंद्राची ॥ प्रसवलि रवि सुत प्राची ॥**
**अरुण करी कुंकुमाचि ॥**
**वृष्टि सकलभूतला ॥ ३ ॥**

विदू०—हा पहा, ज्याचे नेत्र जागरणामुळें आरक्त दिसताहेत असा हा माझा मित्र इकडेसच येत आहे. [ पुढें होऊन ] मित्रा, तुझा विजय असो!

राजा—सख्या माधवा, कसें काय, कुशल आहेना?

विदू०—मित्रा, तुला कोंपरापासून नमस्कार असो. हें पहा, असाच जर मी तुझ्या आणखी नादीं लागलों तर माझे प्राण फार दिवस कांहीं वांचणार नाहींत.

**राजा**—अरे झालें तरी काय?

**विदू०**—भली केलीत आतां! दुसऱ्याच्या डोळ्यांत आपणच बोट घालून उलटें आपणच तूं कां रडतोस ह्मणून विचारावें तसलाच हा तुझा प्रश्न! हें पहा मित्रा, तूं आपला जागरणें करून निगरगट्ट झाला आहेस; व तुझा क्षत्रियाचा देह असल्यामुळें सर्व कांहीं सहन करण्याची तुला शक्ती आहे. पण मी बिचारा शाल्योदन खाणारा ब्राह्मण, तुजबरोबर हेलपाटे घेतां घेतां मरायला टेंकलों आहें. तर एकदां मला विश्रांती दे कसा!!

**राजा**—(मनांत) याचें उदास झालेलें मन आतां दुसरीकडे वळविलें पाहिजे. (उघड) सख्या माधवा, तुला मी लवकरच विश्रांती देईन. पण या आपल्या प्रमदवनाची शोभा सांप्रत पाहिलीस का?

**दिंडी—**[ लीलांबरी ].

मलयवातें पुष्पिणी डोलताती ॥
नर्तनाचा जणु भाव दाखवीती ॥
पुष्परूपें तारुण्ययुक्त होती ॥
भृंगशब्दें अव्यक्त गीत गाती ॥

**विदू०**—मित्रा, खरेंच या मधुमालतीच्या जाळ्यांत परिमळाला भुलून मधुकरांचे थवेच्या थवे जाऊन बसले

आहेत; व या ठिकाणीं एकसारखा पुष्पांचा वर्षाव होत असल्यामुळें मला वाटतें, आपल्याकरितां उद्यानदेवतेनें हा चित्रविचित्र वर्णांचा मऊ मऊ गालिचाच पसरला आहे ! ह ह ह ह.

राजा०—( मनांत ) या गुलामाचें मन दुसरी कडे वळलें हें माझ्या पथ्यावरच आहे ( उघड ) मित्रा तसेंच पहा, सांप्रत वर्षाकाल नसूनही आपल्या या प्रमदवनांत त्याचा प्रादुर्भाव झाल्यासारखा दिसतो.

पद०—(स्फटिकांचे ते पदपथ ) हीचाल.

शिरसांची कुसुमें भूवरती ॥
गळुनि तृणांकुरसम ही शोभाति ॥ १ ॥
जलयंत्राच्या उडती धारा ॥
वाटे वर्षत मेघ झरारा ॥ २ ॥
बंधुकसुमनें गळुनि खालती ॥
इंद्रगोपसम रक्त दीसती ॥ ३ ॥
या सर्वांना पाहुनि वाटे ॥
वर्षाकाल अकालीं भेटे ॥ ४ ॥

विदू०—मित्रा, अगोदरच माझे हातपाय पहा कसे खांडकासारखे ठणकताहेत, तर ज्यावर द्राक्षालतेचीं हिरवीगार दाट छाया पसरली आहे, अशा या शिलातलावर बसूं या, म्हणजे पाय पसरण्याला मिळेल.

राजा—तसेंच करूं या. ( बसतात )

मित्रा, तुला काय सांगू? काल सर्व रात्र मी कष्टानें जागून घालविली! पहा.

पद राग — तोडी — [ जनसारे ] ही चाल.

सुख वाटे मजला नच सदनीं ॥
निद्रा येई कांधिं ना शयनीं ॥ ध्रु० ॥
मृगया न रुचे पूर्वीसम ती ॥
विरहें गात्रें अति कृश होती ॥
उष्ण श्वासें अधर कष्टती ॥
तळमळ करितां न सरे रजनी ॥ सुख० ॥

विदू—मित्रा, मी तुला कितीदां तरी सांगितलें कीं तूं हिचा नांद सोडून दे. तरीं तूं आपला अहिल्येवर इंद्र जसा लंपट झाला होता तसा तिजवर झाला आहेस.

राजा—अरे, हा तारुण्याचा दोष! माझा मुळींच नाहीं.

विदू०—मित्रा, मी तुला फिरून असें विचारतों कीं, तूं असा जो लाळ घोटीत बसला आहेस, त्यापेक्षां तिच्याशीं एकदम लग्न कां करून टाकीत नाहींस?

राजा—मित्रा, असें जर करतां येतें तर माझ्यासारखा या जगांत कोणीच सुखी उरला नसता. परंतु त्या राज-

कन्येचा मी जर उघडपणें अंगीकार केला, तर राणी वासवदत्ता मत्सरभावानें आपल्या जिवाचें काय करील कोण जाणें.

विदू०—आतां या महास्त्रापुढें मात्र आपलें कांहीं चालणार नाहीं हें खचित.

राजा—मित्रा तुला काय सांगू ?

पद.–( बिना आबान् दुलहन् करेना ) ही चा०

काधिं तिला बघिन नयनीं ॥
शशिमुखि। माझ्या। हृदयीं। वास करी ॥
देतो। स्मर पीडा। तिजसाठीं। मज। भारी ॥ ध्रु०
सतत रुचिर ती तिचि मूर्ती ॥ उभि राही ॥
मम चित्तीं ॥ याला। मी तरि काय्। करुंरे
हाय्। कोठें ही। करमेना। विरमेना। मज सदनीं ॥
काधिं० ॥

विदू०—पण मित्रा, तूं जो तिजवर एवढा अनुरक्त झाला आहेस, अशी ती सुंदर तरी किती आहे ?

राजा—अरे, ते दिवशीं राजसभेंत तूंच मजजवळ होतास ना ?

विदू०—हो, होतों खरा, पण नसल्या सारखाच.

कारण, मेंढरेंराख्याला रत्नांची जेवढी परीक्षा तेवढीच मला तिच्या रूपाची परीक्षा.

राजा—तर ऐक.

पद. ( काय परम रमणीय ) ही चाल.

केतकिगर्भापरि अति गौरा कोमल तनु तीची ॥
स्मित हास्य तिचें मजला वाटे कौमुदि चंद्राची ॥
शृंगाराची मूर्तिच अथवा जणु प्रतिमा रतिची ॥
ब्रह्मदेव इस निर्मुनि करितो कमाल अपुल्या
कौशल्याची ॥ केतकि० ॥

विदू०—अरे, हें सर्व खरें; पण तिचा अनुराग तुजवर असल्याचीं कांहीं चिन्हें तुला दिसलीं का ? नाहीं तर हें सर्व अरण्यरोदनासारखें होईल.

राजा—अरे, याहून आणखी काय पाहिजे ?

पद. ( राग—मालकंस. )

हळुच गालिं स्मित करी सुंदरी । मम वदनातें पाहोनी ॥ ध्रु० ॥ मृगिसम चंचल नेत्रकटाक्षा । टाकी मजवरि लाजोनी ॥ लपुनि छपुनि वच माझें ऐकत । होती प्रेमानें कर्णी ॥ परतुनि जातां नूपुरमिष तें । करुनी मज पाहे फिरुनी ॥ १ ॥

विदू०–( एकीकडे ) या राजश्रीच्या हें सर्व पथ्यावर-चेंच आहे.

राजा- तर मित्रा जेणेंकरून माझ्या जिवाला बरें वाटेल असा कांहीं उपाय काढ बरें !

विदू०- हें पहा, या द्राक्षालतेला कसे मधुर मधुर फळांचे घोंस आले आहेत. यांचा येथेंच फराळ करून वर पुष्करणींतलें थंडगार पाणी प्यावें हाच बेत मला पसंत वाटतो.

राजा—या बुभुक्षिताचार्याला खाण्याशिवाय कांहींच सुचत नाहीं.

[ इतक्यांत प्रियदर्शिका व पत्रलेखा बागेंत हिंडत येतात. ]

प्रिय०---पत्रलेखे, त्या पुष्करिणीकडे जाऊंया.

विदू०–मित्रा, या पुष्पवटिकेच्या आड कोणाचा तरी शब्द ऐकूं येतो.

राजा०—काय, माझी थट्टा करतोस वाटतं ?

विदू०—-अरे, तुला माझी थट्टा वाटत असेल तर चल, पाहूंया.

राजा–बरें तर चल. ( वृक्षाआड लपून पाहतात. )

विदू०—मित्रा, तुला आजपर्यंत जिचा निदिध्यास लागला होता तीच ही आपल्या सखीबरोबर बागेंत फिरत आहे. आतां नेत्रांचें पारणें फेडून घे.

राजा—मित्रा, खरेंच तीच ही प्रियतमा! अहाहा धन्य आहे मी आज! आतां ह्या काय बोलतात हें लपून ऐकूं या.

पत्र०—सखे प्रियदर्शिके, या प्रमदवनाची शोभा पाहिलीस ना?

पद- ( लाइबहारबागमे ) ही चा०

जाइजुईचमेलिला नवा बहार हा अला ॥
मधुमालति जाति लता कुसुमित या झाल्या ॥
मधुकरगण मधु पिउनी गुंजनकरुं लागला ॥ जा०॥

प्रिय०—पत्रलेखे, या उपवनांत आल्यापासून माझ्या मनाला आनंद न होतां उलटा ताप होतो.

पद- [ धाडुनि दिधलें ]ही चाल

खेळुनि लतिकासंगें तरुवर ॥
चिडविति बघ मजला ॥ ध्रु० ॥
अतिशय माझ्या पीडा देई ॥
हंसनाद हा कानाला ॥ खेळुनि० ॥
कोकिला मंजुल गाउनि माझ्या ॥
पाडि घरे हृदयाला ॥
येथें येउनि उलटा माझ्या ॥
शूळ मस्तकीं उठला ॥ खेळुनि० ॥

पत्र०—अग, महाराजाना त्या दिवशीं पाहिल्यापासून तुझी अशी स्थिति झाली आहे तें मी समजलें

राजा—ही पत्रलेखा मोठी चतुर खरी.

प्रिय०—

पद. [ चापधरकुमार ] या चा०

**कांत वदन तें मजला कधिं पुन्हा दिसें गे ॥ ध्रु० ॥**
**त्या समयीं राजासनिं ॥ देखियलें मी नयनीं ॥**
**परि नाहीं तृप्ति मनीं ॥ जाउनी बघूं गे ॥ कांत० ॥**

पत्र०—अग वेडे, रोहिणीला आपण होऊन चंद्राकडें मुळींच जायला नको. तूं अशी उतावीळ कां होतेस? महाराज लवकरच तुझे मनोरथ पूर्ण करतील.

राजा—अहाहा! किती तरी यांचा हा मौजेचा संवाद आहे?

प्रिय०—पत्रलेखे, हा पहा या पुष्करिणींत हंसाचा जोडा खेळत आहे. ही हंसी अर्धचर्वित बिसतंतू हंसाला अर्पण करीत आहे. येथून बाई मला हलूं नयेसें वाटतें.

पत्र०—बरें तर. मी येई तोंपर्यंत तुझी जी आवडती अतिमुक्तलता तिचा समाचार घेऊन येतें. ( जाते. )

विदू०—मित्रा, ती रांडलेक पत्रलेखा गेल्यामुळें हा एकांतवास आयताच तुझ्या पथ्यावर आहे नाहीं का?

राजा—( हर्ष पावून )

पद—( सायंकाळीं नृप सदनाचा ) ही चा०

धन्य धन्य मी आजि जहालों ॥

वाटे सुखशैलावरि बसलों ॥ ध्रु० ॥
निद्रा नच आल्यानें स्वप्नीं- ॥
देखिल नच जी दिसली रमणी ॥
तीतें सांप्रत पाहुनि नयनीं ॥
बावरुनी गेलों ॥ धन्य० ॥ १ ॥

प्रिय०—( घाबरून ) अगबाई! कमलिनींच्या परागांची सारी धूळ माझ्या डोळ्यांत घालून मला आंधळी करणारा असा हा मेला दांडगा वायू कुणीकडून आला? ( पदरानें डोळे झांकते. )

विदू०—मित्रा, पाहिलेंसका या प्रचंड वाऱ्यानें परागांच्या धुळीनें हिचे डोळे अगदीं आंधळे केले आहेत. हे वेळेस जर तूं पुढें जाऊन तिला सांवरशील तर ती तुला पत्रलेखा समजून भेटेल. तुझें दैव मोठें खरें.!

राजा—वाहवा, काय नामी युक्ती सुचवलीस?

प्रिय०—अगबाइ! पत्रलेखे, लवकर ये. या मेल्यानें पहा माझी कोण दशा केली ती!

विदू०—अग वेडे, या वायूनें तुजवर मोठा उपकार केला असें होणार आहे.

( राजा एकदम जाऊन आलिंगन देतो व ती पत्रलेखा समजून त्यास भेटते. )

राजा०—

पद. ( बलाकाहै गम् टूटा ) ही चाल

सख्या हे प्रबल समीरा ॥ ध्रु० ॥
परागमिश्रित वाहुनि पवना ॥
सखिच्या झांकिशि पंकजनयना ॥
ह्मणुनी मज आलिंगनदाना ॥
दिधलें तव उपकार खरा ॥ सख्या० ॥

प्रिय०—पत्रलेखे, तूं वेळेवर आलीस ह्मणून बाइ बरं झालं. नाहीं तर, या वाऱ्यानें माझी उडून जाण्याची वेळ आली होती. त्या मेल्या दांडग्या वायूचा संचार नाहींसा होईपर्यंत मी मुळींच डोळे उघडणार नाहीं. तू मला मात्र सोडूं नकोस हो!

राजा—( तिचे नेत्र पुसून )

पद. ( ज्या सदा वसति तुज० ) ही चाल.

सुंदरी उघडि निज नयनकमल ॥ सुंदरी० ॥
भीति धरूं नको त्या पवनाची ॥ ध्रु० ॥
एकवार मधु हास्य करिशि जरि ॥
मानि मी तरिच हें जन्म सफल ॥ सुंदरी० ॥

प्रिय०—अगबाई, हा पत्रलेखेचा शब्द नव्हे! ( रागानें ) कोण हा चांडाळ मला स्पर्श करीत आहे तरी?

[ राजाला पाहून लाजून दूर होते ]

राजा—पद. [ केलीस अशीकाय परिक्षा ] ही चा०

दास तुझा सुंदरि हा अन्य कुणि नसे ॥

बहु मजला कुसुमचाप ताप देतसे ॥
मूर्ति तुझी मन्मानसमंदिरीं वसे ॥
या समयीं लीन तुझ्या चरणिं मी असे ॥ १ ॥

( इतक्यांत पत्रलेखा येते. )

**पत्र०**—[ टाळी वाजवून ] अगबाई ! मोठा वारा सुटून मोतियाची वेल डळमळूं लागली परंतु ऐन वेळेस आम्रवृक्षानेंच तिला सांवरिलें. मग मी कशाला हवी आहे ?

**प्रिय०**—पत्रलेखे, या थट्टेची मी तुला केव्हां तरी आठवण देईन हो !

**विदू०**—कां मित्रा, तूं एवढीं राज्याचीं सूत्रें हलवितोस पण अखेरीस मी सांगितलेलीच युक्ती फत्ते झालीनां ? [ राजा हंसतो ]

**पत्र०**—महाराज, या माधवीलतामंडपांखालीं विस्तीर्ण स्फटिकाचा चौरंग आहे यावर बसून अंमळ विश्रांती घ्यावी.

[ राजा व विदूषक तसें करून सर्व बसतात. ]

**राजा**—पत्रलेखे, या तुमच्या सखीचा नामकुलवृत्तांत ऐकण्याची आह्माला फार उत्सुकता आहे !

**पत्र०**—सांगतें ऐकावें महाराज !

पद. [ चंद्रकांत राजाची कन्या. ] ही चाल.

अंगदेशनृप मोठा ह्मणती दृढवर्मा ज्याला ॥
एकुलती ही त्याची दुहिता लाजवि जी रतिला ॥
विंध्यकेतु वनराजा होता त्याचा प्रिय मित्र ॥
बाल्यापासुनि हिला तयानें केलें गुणपात्र ॥
निजदुहितेसम विंध्यकेतु हिस वाढवि निजसदनीं ॥
तरुछायेसम हिच्यासवें मी होतें सखि ह्मणुनी ॥
करुनि घोर रण आह्मा अणिलें अपुल्या सेनेनें ॥
पुढिल कथा ती काय वदावी अपुल्या वदनानें ॥१॥

विदू०—मित्रा, ही पत्रलेखेनें सांगितलेली सर्वच कथा अगदीं अश्रुतपूर्व दिसते.

पत्र०—महाराज, आपण दुष्टांचे शासनकर्ते आहांत. तर, या आमच्या सखीची दुष्ट मदनानें काय दशा केली आहे पहा! त्याच्या तापापासून हिला सोडवून पदरीं घ्यावें एवढीच काय ती प्रार्थना आहे.

[ प्रियदर्शिका लाजून खालीं बघते. ]

राजा—अहाहा सुवदने !

साकी.

रति दुसरी अशि तव सखि इच्छी ममसंगम जरि भारी।
सुखद चंद्रिका अंगीं पडतां कोण पटानें वारी ॥

मजवरि हा तुमचा । अनुग्रह थोर असे साचा ॥ १ ॥

विदू०—पत्रलेखे, मजसारख्याला पंचपक्वान्नांचें आयतें वाढून आलेलें ताट जसें सोडवत नाहीं, तसाच तुझ्या या सखीचा अनादर महाराजांकडून मळींच होणार नाहीं.

प्रिय०—पत्रलेखे, माझी मस्तकबाधा कांहीं केल्यानें जात नाहीं. काय करुं बाई ?

पत्र०—हें पहा, सर्व बाधेपासून महाराज आतां तुला दूर करतील.

प्रिय०—पुरे बाई. तुझी मेली सारी थट्टाच !

[ पडद्यांत. ]

अहो माधवभटजी, राणीसाहेब तुमची वाट पाहत बसल्या आहेत. चला लवकर.

विदू०—मित्रा, खरेंच. आज मला राणी वासवदत्तेनें वायन घेण्याकरितां बोलावलें आहे. तर चला. तुझें काय ठीक आहे, पण इकडे भुकेनें माझा जीव कासाविस झाला आहे.

राजा—बरें, महाब्राह्मणा, जाऊं चला. नाहीं तर ती चेटी इकडे येऊन हें वर्तमान राणीला सांगेल.

पत्र०—महाराज आपल्या दर्शनानें आज आपल्या

सखीवर मोठा अनुग्रह केला. मात्र एवढीच विनंती आहे कीं अंत:पुरांत गेल्यावर आमच्या सखीचा विसर पडूं नये.

**राजा**—पत्रलेखे,

पद. राग--देस [ मोरे सर भयोरी पसंत ताज ] ही चाल.

**तव प्रियसखिला विसरेन काय् ।**
**कां लाजविसी ॥**
**एक क्षण मज युगसम जाय् ॥ ध्रु० ॥**
**आधिंच तवसखिविरहें छळिलें ॥**
**त्यांत तिनें मन माझें हरिलें ॥**
**उरला मागें हा जड काय् ॥ तव० ॥ १ ॥**

**विदू०**---पत्रलेखे, आज महिनाभर या राजश्रीनीं जर अंत:पुराचें दर्शन घेतलें असेल तर शपथ.

**प्रिय०**---पत्रलेखे, हा भट संपादणी करण्यांत मोठा चतुर दिसतो ग !

**विदू०**—मित्रा, हें वर्तमान जर त्या चेटीनें जाऊन राणीला सांगितलें तर अगोदर आमचेंच यथेच्छ कांडात् निघेल. तर चल कसा लवकर.

**राजा**—पत्रलेखे, लवकरच [ दोघे जाऊं लागतात ] मी पुन्हा भेटेन. [ पडद्यांत ] अहोभडजी—

**पत्र०**—सखे महाराजांचें आश्वासन मिळालें. तर अतां स्नानाला जाऊंया.

प्रिय०— पद.—[ कां आड सखे ] याचा०

कां घाई करिशि गे वांयां ॥ ध्रु० ॥
बहु कष्टानें येणे केलें ॥
मधुर बोल ते कर्णीं पडले ॥
परि वेडें मन तृप्त न झालें ॥
उचले पद नच जाया माझें ॥ कां ॥

[ राजाकडे पाहत निघून जातात ]

विदू०—मित्रा, चल आतां ती दूर गेली.

राजा— पद. ( राग—पिलु )

कधिं सुंदरि ती पुनरपि भेटे ॥
उत्कंठेनें मन हें दाटे ॥ ध्रु० ॥
उठली जी आलिंगनसमयीं ॥
रोमांचांची पंक्ती देहीं ॥
ती अद्यांपि न जाई वाटे ॥ कधि० ॥ १ ॥

( जातात )

( अंक दुसरा समाप्त. )

---

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला.

[ राणी दासीसह प्रवेश करिते. ]

**राणी**—सखे कुसुमावती,

पद. [ स्फटिकाचे हे. ] या चालीवर

**व्यर्थ असे समजूत जनांची ॥**
**राजस्त्रियेला सुख बहु असतें ॥**
**अंतःपुरिंची परि स्थिति कोणा ॥**
**इतर जनाला ठाउक नसते ॥**
**नाथ पहा हे अमुचे कैसे ॥**
**नवयुवतीलंपट झाले ते ॥**
**या चिंतेनें निशिदिनिं माझें ॥**
**मन बघ कैसें तिळतिळ तुटतें ॥ १ ॥**

**कुसु०**—बाईसाहेब, उगीच शोक करून आपले जिवाला वाईट वाटून घेऊं नका.

**राणी**—गडे, कुसुमावती,

पद. ( अजि शेवटचा लाभचि हा. ) या चालीवर

**महाराजांचें मन सवतीवर गेलें ॥**

या शोकें मन हुरहुरलें ॥
विरहाग्नीची हृदयीं भडकुनि ज्वाला ॥
करि व्याकुल मम देहाला ॥ चाल ॥
मज बघति न ते ढुंकूनी ॥
नच निद्रा येई शयनीं ॥ चाल ॥
या चिंतेनें कांहिं नकोसें झालें ॥
बघ उपाय कांहिं न चाले ॥ १ ॥

**कुसु०**—बाईसाहेब, रडून रडून डोळे अगदीं मुठी सारखे झाले आहेत. हा शोक आतां पुरे नाहीं का करीत?

**राणी०**—( शांत होऊन ) कायग कुसुमावती, महाराज व माधवभटजी आज घाईघाईनें राजवाड्याच्या गच्चीवर जाताना मी पाहिले असं तूं मला सांगितलंस तें खरंना ?

**कुसु०**—होय बाईसाहेब ! मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलं; आणखी यावरून मला असं वाटतं कीं, जिचा महाराजानां एवढा नाद लागला आहे तिच्याशीं ते त्या एकांतस्थळीं रममाण होणार असतील.

**राणी**—कुसुमावती, तुझा तर्क अगदीं खरा आहे. हें पहा त्या दिवशीं प्रतीहारीनं राजसभेंतला तो पोरखेळ सांगितल्यापासून मला तर त्या अवदसेचा पक्का संशय आला आहे. राजसभेंत असतानां उभयतांचं तें चोरून पाहणं, गाल्यांतल्यागालांत हंसणं

हें सर्व एकूणएक मला प्रतीहारीनं येऊन सांगितलं. अग, या सगळ्या महिन्यांत माझ्या मंदिरांत त्यांनीं एकदां तरी पाऊल टाकलं आहे का? हे विषयलंपट महाराज जे दिवशीं ताळ्यावर येतील तो खरा सुदिन, असं मी समजेन.

कुसु०—बाई साहेब, कुलदेवतांच्या प्रसादानं महाराजांची प्रीति आपणांवर पूर्वींप्रमाणं जडेल.

राणी—अग, देवता तरी कुठं प्रसन्न होताहेत?

कुसु०—बाई साहेब, इतक्या ज्या आपण झुरणीला लागलां आहांत त्या सर्वांला कारण त्या अवदसेचंच कौटाळ; तिनं कसं महाराजांवर मोहनास्त्र टाकलं आहे.

राणी—( संतापून ) थांब या सर्वांचा मीच समाचार घेतें. आतां ते कपटी महाराज बहुतरून याच वेळेला राजवाड्याच्या गच्चीवर त्या अवदसेबरोबर रममाण झाले असतील तोंच मी स्वतः जाऊन त्या दोघांचा खरपूस समाचार घेतें.

पद. ( होशिल मग कौसल्यादासी ). या चालीवर.

त्या विषयी कपटी राजाला ॥
निंदुन आणिन बहु लज्जेला ॥
बांधुन मुसक्या त्या अवदाशिला ॥
धाडिन वनवासा ॥ १ ॥
ज्या सटवीनें मम नाथाला ॥

मोहीं पाडुनि वेडा केला ॥
सूड तिचा मी उगवायाला ॥
राहिन काशि आतां ॥ २ ॥
( दोघी जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( उत्कंठित झालेला राजा व विदूषक प्रवेश करितात. )

राजा---

पद. ( कवणें तुज गांजियलें. ) या चालीवर

भेटलि त्या समयिं जरी प्राणमोहिनी ॥
परि मन्मथ अद्यापी ताप दे मनीं ॥ ध्रु० ॥
मदनशरें छिद्र उरीं। जें केलें मम अंतरिं ॥
त्यांतुनि ती कां सुंदरि। आंतगमे गेलि तरी ॥
ताप कसा त्या वांचुनि देइ निशिदिनीं ॥ १ ॥

हे कृतघ्ना कुसुमायुधा कामदेवा !

पद-[ मजवरि तरु कुसुमरेणु ] या चालीवर.

अनुदिनिं तुज वाढविलें हृदयिं मी स्मरा ॥
परि विपरित होउनियां छळिशि या नरा ॥ ध्रु० ॥
पंचबाण सोडुनि मज करिशि घाबरा ॥
दुर्विपाक विषतरुसम होशि तूं खरा ॥ अनु० ॥

विदू०—या प्रदोषकाळची शोभा पाहिलीस कां ? या राजवाड्याच्या गच्चीवर चांदणं पहा कसं पिठासारखं पडलं आहे. मला वाटतं आकाशांतून कापराच्या राशींचाच वर्षाव होत आहे. अथवा हीं चंद्रकिरणं जणुं काय आपल्या राजवाड्याला सफेतीच देत आहेत ! !

राजा— ( श्वास टाकून ) सख्या, काय सांगू रे ?

पद— ( राग- मालकंस- ताल- त्रिवट )

**चंद्रकिरणिं मम अंग जळे ॥**
**मंदारपवन नच सुखवि शीत जरि ॥ ध्रु० ॥**
**मणिमाला जरि अंगीं धरिली ॥**
**तनु तापवि मम उलटी भारी ॥ १ ॥**

मित्रा, बरं पण तूं प्रियेकडे माझा निरोप घेऊन गेला होतास त्याचं काय झालं सांग पाहूं ?

विदू०—अरे, मी तिथें गेल्यावर प्रियदर्शिका वहिनी पल्लवशय्येवर म्लान होऊन पडलेली पाहिली. ती लाजेमुळें माझ्याशीं मुळींच बोलली नाहीं. परंतु पत्रलेखा मात्र ह्मणाली, कीं, माझ्या सखीचा मदनसंताप कमी होण्याकरितां आज प्रदोपकाळीं महाराजांचे दर्शनासाठीं राजवाड्याचे गच्चीवर हिला घेऊन येईन.

राजा—हे भगवंता रतिरमणा !

## साकी.

मजसम तिजला पीडुनि निशिदिनिं तापविशी रे उभयां ॥ परि नच करुणा येइ कठोरा धनुतें सज्ज कराया ॥ संगमसुख जेव्हां ॥ देशिल मानिन तुज तेव्हां ॥

विदू०—( आपल्याशीं ) हे राजश्री पुन्हां मृगतृष्णिकेच्या मार्गी लागले.

राजा—खरंच मित्रा आज असं होईल कां रे ?

पद. ( परम मुवासिक पुष्पें ) या चालीवर.

शशिवदना या प्रदोषकाळीं दर्शन मजला देइल काय ॥
सखिसह येउनि सलज्ज मजवरी नेत्रकटाक्षा टाकिल
काय ॥
हळुच येउनी कोमल कर या कंठीं माझ्या घालिल
काय ॥ अधरसुधामधु पाजुनि माझा कठिण रोग
हा सारिल काय ॥ १ ॥

विदू०—अरे, प्रत्यक्ष भगवान् कामदेव तिचा सहाकारी होऊन लवकरच तिला इथे घेऊन येईल.

राजा—पण मित्रा, तोंपर्यंत मी कशानं मनाचं रंजन करूं सांग बरं ?

विदू०—हें बघ, उपाय अगदीं सोपा आहे. तूं डोळे

मिटून तिचं चिंतन करीत बैस, व मी या थंडगार चंद्रकिरणांचं सेवन करीत बसतों.

**राजा**—बरं तर मी तिचें चिंतन करीत बसतों.

( इतक्यांत प्रियदर्शिका अभिसारिकेच्या वेषानें, पत्रलेखेसह येते. )

**प्रिय०**—

पद. (त्या मदनमनोहर रूपीं ) या चालीवर.

**जरि चंद्रवदन तें माझ्या दुसऱ्यानें दृष्टिस पडलें ॥**
**जरि आलिंगन देऊनी त्यासमयीं मज सांवरिलें ॥**
**तरि पाहिन केव्हां ऐसें उत्कंठित मन हें झालें ॥चाल॥**
**भेटवी सखे मज त्याला ॥ मम रमणाला ॥ चाल ॥**
**किति चिंतन मी तरि केलें ॥ पळ एक युगासम गेलें ॥ १ ॥**

**पत्र०**—अग, तूं एवढा नट्टापट्टा करून अभिसारिकेच्या वेषान त्या राजाकडे घाईघाईनं चालली आहेस पण ठेंच लागून पडशील हो! कोण तरी मेला हा उतावीळपणा ?

**प्रिय०**—इश्श, पुरे बाई! ही कायग तुझी थट्टा ? मी नाहीं एवढी अधीर झालें हो.

**पत्र०**—गडे, पाहिलासका, धवल चंद्रिकेनं धुतल्यामुळं हंसदेहासारखा पांढरा शुभ्र दिसणारा व फार उंच

असल्यामुळं कैलासाशीं स्पर्धा करणारा हा त्या राजाचा राजवाडा. ह्याच्याच गच्चीवर संकेतस्थानीं तुझा प्रियकर तुझी वाट पहात बसला असेल.

प्रिय०-चल तर, मला जिन्याची वाट दाखीव. गडे, पण त्या राजापुढं निर्लज्जा सारखं माझ्यानं बाई जाववणार नाहीं !

पत्र०—अग, तुझ्या गळ्यांतला हा हार हळुच मागून जाऊन त्याच्या गळ्यांत घाल ह्मणजे तूं आलीस असं तो समजेल. नाहीं तरी मी तुझी पाठराखीण आहेच.

प्रिय०---गडे, नामीं युक्ति सुचविलीस.

पत्र०—अग, हा पहा मोर जसा मेघमालेची वर मान करून मार्गप्रतिक्षा करतो, तसा हा राजा डोळे लावून तुझी वाट पहात बसला आहे.

प्रिय०-—गडे, रत्नभूषणांचा जरी या राजानं त्याग केला आहे, तरी हा मला पूर्वीपेक्षांही रमणीय दिसतो !

पत्र—अग, हा सर्व कामदेवाचा, व प्रदोषकाळाचा गुण आहे समजलीस ?

प्रिय०—बरं तर गडे, या उभयतांचा काय संवाद होतो, तो ऐकूं नी मग पुढं जाऊं.

विदू०—मित्रा, तुझी करमणूक करण्याचा एक उत्तम

उपाय मजजवळ असून मी सांगायचा विसरलों. हें पहा, मी आपल्या पंचाच्या पदरांत कमलपत्र बांधून आणलं आहे. यावर काय लिहिलं आहे तें तूंच वाच.

राजा—हा मूर्खा, निरक्षरा ! आण बरं इकडें पाहूं ; ( वाचतो. ) सकलगुणमंडित सार्वभौम वत्सराज यांस—

पद—( तव मानस कैसें काय. ) या चालीवर.

**॥ हे भ्रमरा रसिका ॥ मधुपानीं चतुरा ॥**
**अभिनव मधुनीं युक्त मी नलिनी ॥**
**आस मनीं धरुनी ॥ बघतें वाट घरा ॥ १ ॥**

प्रिय०—अगबाई, मी लिहिलेला मदनलेख या भटानं कुठून आणला ?

पत्र०—अग, अपूर्व वस्तु ह्मणून हा त्यानं राजाला दाखविण्याकरितां आणला असेल !

राजा—मित्रा, मला असं वाटतं, हा त्या चारुगात्रीनें मला लिहिलेला मदनलेख असावा. अर्थ किती खोल, व गीत-खंड किती मधुर ?

विदू०—अरे, तूं खंड खंड कायसं ह्मणालास त्याव-रून मला श्रीखंडाची आठवण झाली.

राजा—हा मूर्खा अधाशा, श्रीखंड नव्हे, गीतखंड ह्मणजे गीताचे चरण, समजलास!

(कमलपत्राचें चुंबन घेऊन मस्तकीं ठेवितो.)

विदू०—असं असं. मला वाटलं कीं ती तुला श्रीखंडाचीच मेजवानी देणार असेल.

प्रिय०—सखे, मी मदनलेख लिहून आपला साहसिकपणा दाखविल्याबद्दल महाराज मजवर रागावणार तर नाहींतना?

पत्र०—अग वेडे, त्यांनीं उलटं त्याचं चुंबन घेऊन त्याला मस्तकीं धारण केलं आहे.

राजा०—सख्या माधवा, ती गजगमना अजून कां बरं येत नाहीं?

पद. (जा देख चमन) या चालीवर.

हा मदन मला रे बहु जाळी ॥ ध्रु०॥
ती सतत सुंदरी मम हृदयमंदिरीं ॥ करि विहार अंतरीं ॥
जणुं तटिनी कंदरीं ॥ मज चैन नसे या काळिं ॥ रे बहु जाळी० ॥ १ ॥

काय करूं रे मित्रा?

पद.—(मुझे नादान् तूं है) ही चाल.

कधिं पाहिन ती या क्षणीं ॥

हरिणीनयनी, तरुणी, रमणी ॥ ध्रु० ॥
नच तिस त्यजुनी। सुख मज भुवनीं ॥
कांहीं, नाहीं, पाही, चैन पडत
मन्मनीं ॥ पाहिन ती० ॥ १ ॥

प्रिय०—पत्रलेखे, या राजाचा विरह पाहून माझ्यानं आतां बाई धीर धरवत नाहीं.

पत्र०—अग, हीच वेळ उत्तम आहे. तर हळुच जाऊन हा हार त्यांच्या गळ्यांत घाल. (प्रियदर्शिका तसें करते.)

विदू०—( हार पडल्यावर चपापून ) अरेचा! मित्रा, हें रांडलेक सर्पाच्या वेटळ्यासारखं काय एकदम येऊन तुझ्या गळ्यांत पडलं ?

राजा—मूर्खा ही पुष्पमाला! मला वाटतं दुसरी पत्रलेखाच, अशा या हिला अगोदर पुढें पाठवून प्रियेनें आपलें आगमन सूचित केलें असें दिसतें, तर माधवा, तूं आपल्या वहिनीला घेऊन ये बरें ?

( विदूषक उठून बघण्यास जातो. )

विदू०—अरे वा! मित्रा, यमुनेला बरोबर घेऊन जशी गंगा आपला पती जो सागर त्याला भेटण्याकरितां जाते तशी ही आमची वहिनी अभिसारिकेचा वेष घेऊन या प्रदोषकाळीं तुला भेटण्याकरितां सखीसह आली आहे.

राजा—( उठून प्रियदर्शिकेला हातीं धरितो. ) अहाहा सुंदरी,—

पद. ( वाटे सर्वथा मुक्त झालों. ) या चालीवर.

गेला सर्व तो ताप आतां ॥ ध्रु० ॥
पीडि जरि स्मर मला ॥
आज प्रिय जाहला ॥
पावतां सुतनु तव संगमाला ॥
दे अतां गाढ आलिंगनाला ॥ १ ॥

( आलिंगन देतात. ) पत्रलेखे, बैस.

पत्र०—कां महाराज, हा चंद्रिकाप्रकाश आपणाला आतां आनंद देतोना ?

राजा—पत्रलेखे, हें काय विचारावें ?

दिंडी.

जशी चपलेला रुचिर मेघमाला ॥
नेइ एकांतीं कांतसंगमाला ॥
तसें आणितां तूं इथें सुंदरीला ॥
चंद्र कैसा मग तापवी तनूला ॥ १ ॥

विदू०—पत्रलेखे, दहीभात दिला असतां, जसं पिशाच शांत होतं तसं याचं मन आतां शांत झालं.

**राजा**——मित्रा, तूं हिच्या विरहाची चिन्हें जीं मला सांगितलीं होतीस, तीं अगदीं बरोबर जुळतात. पहा——

पद. ( मालकंस ) त्रिवट.

चंदनलेपन अति शीतल हें ॥
अर्पियलें सखिकुचयुगलाला ॥ ध्रु० ॥
कृशता पसरुनि अंगीं हीचे ॥
पांडुरता ये वदनाला ॥
शरदर्क जसा केतकितें ॥
तैसा स्मर तापवि सुंदरिला ॥
करुणरसाची मूर्तिच वाटे ॥
विरह व्यथेनें ही मजला ॥ १ ॥

( पडद्यांत ) अग कुसुमावती, तो माधवभडजी कुठं आहे मला दाखीव पाहूं.

**प्रिय०**——( घाबरून ) पत्रलेखे, प्रखर विस्तवाप्रमाणें लालडोळेकरून ही राणी संतापलेली दिसते तर चल लवकर कशी इथून. हे चारुगात्रा, आतां ही दासी आपली आज्ञा घेते.

( राजाकडे पहात निघून जाते. )

( कुसुमावतीसह राणी प्रवेश करिते. )

**राणी**——( रागानें ) कायग कुसुमावती, आधीं मला माधवभडजी कुठं आहे तो दाखीव. अगोदर त्याचाच स-

माचार घेतें. तोच मेला लुब्रा या कपटनाटकाचा सूत्रधार आहे.

( दासी मुसक्या बांधते. )

विदू०---( घाबरून ) ग्रामदेवतेला जसा प्रथमदर्शनीं बोकड बळी देतात, तसा या राणीचा सगळा राग माझ्यावर दिसतो; तर मित्रा मला वांचीवरे वांचीव !

**राजा**---अरे असा घाबरतोस कां? आपण दोघेही यांतून सुटून जाऊं असा मी उपाय काढतों.

**राणी**---अहो महाराज आपण मोठ्या शिताफीनें हा एकांतवास हुडकून काढलात, पण अखेरीस खरा चोर माझ्या जाळ्यांत सांपडलाच. माझं पाणिग्रहण करतांना " धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि " अशा देव, ब्राह्मण, व अग्नि, यांच्या समक्ष ज्या आणाशपथा वाहिल्यात, त्यांचा हाच उजेड लावलात वाटतं?

**विदू०**---राणीसाहेब, मी गरीब बिचारा ब्राह्मण आहे माझ्याकडे कांहीं अपराध नाहीं.

**राजा**---देवी वासवदत्ते, पुरतेपणीं समजून न घेतां हा भलताच आरोप मजवर काय ह्मणून घेतेस? हें पहा मी इथें कशाकरितां आलों होतों तें ऐक,

**राजा**---

पद( अजि साहेब् नतीजा ) ही चाल.

**सुंदरी धरुं नको मनिं रागा ॥**

मजवरी करी गे अनुरागा ॥ ध्रु० ॥
या प्रासादीं सुस्वर गातां ॥
सहज पाहिली ती नृपदुहिता ॥
आलों येथें मोहित होतां ॥
झालें मन तल्लीन् ॥
करीं गे अनुरागा ॥ सुंदरी० ॥ १ ॥
मधुर गायनीं काल कंठितां सहज मती भुलली॥
तोंच तूझी क्रुद्ध मूर्ती एकाकी आली ॥
क्षमा करी गे या दासाला ॥
चरणिं तुझ्या मी लीन् ॥ करीगे अनुरागा॥१॥

राणी—पुरे पुरे ही सर्व संपादणी मी पुरती समजलें.

विदू०—बाईसाहेब, हें पहा महाराज आतां तुमच्या पायां पडले, आतां तरी शांत व्हा !

राणी—गुलामा, खबरदार तूं बोललास तर; असल्या ढोंगाला मी मुळींच फसायची नाहीं.

राजा—हे वासवदत्ते, पुरे हा राग. आतां शांतहो.

पद [ नच सुंदरि ] या चालीवर.

सखि कोप न करि ऐसा ॥ प्रेमें बघ या दासा ॥
॥ ध्रु. ॥ कोपानें तव कोमल ॥ अधर स्फुरे कैसा ॥

श्वासें कुच थरथरती ॥ रक्त नयन किति होती ॥
रम्य अशी तव मूर्ती ॥ ठसली मम हृदयांतीं ॥
आलिंगुनि दीनातें ॥ करि सुंदरि हासा ॥ १ ॥

राणी—माझं नावडतीचं आलिंगन कशाला पाहिजे? आपल्या आलिंगनसुखाची मालकीण दुसरीच होऊन बसली आहे. ठीक आहे. जा ग कुसुमावती, आत्तां जाऊन सारथ्याला सांग कीं, आतां त्या अवदशीच्या मुसक्या बांधून तिला रथांत घालून घोर अरण्यांत सोडून दे. [ कुसुमावती जाते ] अहो महाराज, आतां मी आपल्याला व आपल्या प्रियकरिणीला अखंड एकांतवास करून दिला आहे तिथे खुशाल तिच्याशीं रममाण व्हा. तिथे श्वापदांखेरीज कोणी देखील आपल्या सुखाचा भंग करणार नाहीं. आतां माझी प्रतिज्ञा अगदीं पूर्ण झाली.

पद ( होशिल मग कौसल्यादासी ) या चालीवर

या विषयी कपटी राजाला ॥
निंदुनि आणिला बहु लज्जेला ॥
बांधुनि मुसक्या त्या अवदाशिला ॥
धाडिलि वनवासा ॥
ज्या सटवीनें मम नाथाला ॥
मोहीं पाडुनी वेडा केला ॥

सूड तिचा मी हा उगवीला ॥
जाते कशि आतां ॥ १ ॥

[ जाते. ]

राजा—[ तिच्यामागें धांवत जाऊन. ] थांब थांब जाऊं नकोस. मित्रा पाहिलसना? ही रागानें पाय आपटीत निघून गेली. ही कोपिष्ट राणी आपली प्रतिज्ञा खरी केल्याखेरीज कधीं राहणार नाहीं. अखेरीस त्या चारुगात्रीच्या कपाळीं हा वनवास यावाना! हर हर—

पद [ हरिणाक्षी ती प्रिया माझी ] या चालीवर.

बहु आनंदें मज भेटाया आली असतां शशि-
मुखि बाला ॥ मत्सर भावें कुपित होउनी ॥
देवीनें त्या घातचि केला ॥ ध्रु० ॥ मरंदपूरित
स्वादु कमलिनी ॥ प्राशाया जों मधुकर वळला ॥
इतुक्यामध्यें हिमवृष्टीनें ॥ दूरचि केले त्या उभयां
ला ॥ नकळे वनवासा पाठविलें ॥ कीं राणीनें
सुंदरिला ॥ १ ॥

[ जातात. ]

अंक ३ रा समाप्त.

---

# अंक चवथा.

## प्रवेश १ ला.

( कष्टी झालेली पत्रलेखा प्रवेश करिते. )

पत्र०— ( दुःखानें ) हरहर ! देवा ! ! माझी आणि माझ्या प्रिय मैत्रिणीची ताटातूट होईल असं मला स्वप्नीं देखील वाटलं नव्हतं. काय त्या वासवदत्ता राणीचा मत्सर-भाव सांगावा ? तिनं त्या अनाथ गाईला दूताकडून रथांत घालून एका घोर अरण्यांत सोडून दिलं आणखी शेवटीं अशा रीतीनं तिनं आपला पण पुरा केलाच. ( डोळयांत अश्रु आणून ) माझ्या प्रिय मैत्रिणीवांचून माझे प्राण आतां खचित राहणार नाहींत. त्या राजवाडयांतून मी आपली कशीतरी सुटका करून घेऊन एथपर्यंत आलें. आतां मला या संकटांत त्या यौगंधरायणावांचून कोणी देखील साहाय्य करणारा दिसत नाहीं. तो उदार व द-याळू असून माझ्या प्रेमपाशांत बद्ध झालेला दिसतो. माझं मन त्याच्यावर गेलं आहे हें मात्र मी त्याला अजून कळूं दिलं नाहीं. लढाईंत आम्हाला हरण करून येत असतांना वाटेंत त्याची ती त्यावेळची मजविषयींची अभिलाषमुद्रा अजून मला पक्की आठवते. तर आतां त्याच्या कडेसच

जावं हें बरं. ( साशंक होऊन ) बरं पण मी तिथें गेलें नी त्यांनीं जर प्रेमकथा काढली, तर कसं करावं बरं? एकीकडून सखीच्या शोधाची इच्छा सोडवणार नाहीं व दुसरीकडून सेनापतीचा प्रेमपाश ही तोडवणार नाहीं. अरे! पण काय मी वेडी आहे पहा? त्याची जर खरोखरच मजवर प्रीति असेल तर मी जें जें म्हणेन तें तें तो ऐकेलच. तर सखीच्या भेटीचीच अट घालून ठेवावी म्हणजे झालें. मना, आतां धीर धर. भगवंता कुसुमायुधा, तिकडे यौगंधरायणाच्या अंतःकरणांत तूं मजविषयीं अशीच प्रेरणा करून ठेव. आई जगदंबे माझ्या या कार्याला यश दे, एवढंच हात जोडून मागतें.

( पडद्यांत. )

" पहिला पहारा होश्शयार. "

अगबाई! हा पहारेकऱ्यांचा आवाज ऐकूं येत आहे. तर हाच त्या सेनापतीचा वाडा. तर आतां आंत जावं. ( जाते. )

---

## प्रवेश २ रा.

(यौगंधरायण सचिंत बसला असतांना पडदा उघडतो.)

**यौगंध०—**

पद—( जब तेरे सीतम् से. ) ही चाल.

**फसलि गोष्ट काय करूं काय करूं आतां ॥**

**सहज जुळुनि योग अला होता ॥ ध्रु० ॥**
**सुंदर तो समय पहा ते दिनिं गमवीला ॥**
**कळुनि वळुनि घात मीचं केला ॥ फसलि० ॥**

काय करावें बरें! पत्रलेखा आपणाला प्राप्त कशी होईल या विचारानें माझें मन रात्रंदिवस कसें अस्वस्थ झालें आहे. काय तरी मी वेडा! पहा कीं विंध्यकेतूशीं तुंबळ युद्ध करून मी विजयी झालों असतां तेच वेळेस महाराजांना जर पत्रलेखेविषयीं मागणी केली असती तर त्याचं क्षणीं आमच्या उदार महाराजांनीं ती मला अर्पण केली असती. पण आम्ही आपल्या मनाचा उलट उदारपणा दाखवून महाराजांना म्हणालों,

( "इतरां जें व्रच." ही पुर्वोक्त साकी ह्मणतो. )

या प्रमाणें आपणच आपल्या पायावर धोंडा पाडून घेतल्यावर मागाहून शोक करण्यांत काय अर्थ आहे? ( आविर्भाव दाखवून ) अरे पण माझे बाहू कां स्फुरण पावताहेत? परचक्राच्या शोधाकरितां मी आपल्या शकुनी दूताला पाठविला आहेच. तेव्हां या चिन्हाप्रमाणें जर तसाच प्रकार घडून आला तर सध्याच्या कार्यभागीं त्याच मला फारच सहाय्य होईल. कारण तशा सारख्या परचक्राशीं टक्कर मारून मी महाराजांना पुन्हा पूर्वीप्रमाणें संतुष्ट करून पत्रलेखेला मागून घेईन.

( इतक्यांत एक शिपाई येतो. )

**शिपाई**—सेनापती महाराज, सेनानिवेश पहाण्याची वेळ झाली. तर, महाराजांनीं चलावें.

**यौगंध०**—माझें मन आज स्वस्थ नसल्यामुळें सेनानिवेश पाहण्यास माझें येणें आज होत नाहीं. सबब तो तुह्मीच पहा असें विजयसेनास जाऊन सांग.

**शिपाई**—जशी महाराजांची आज्ञा. ( जातो. )

**यौगंध०**—( आपल्याशीं ) बिच्याऱ्या यौगंधरायणा, तूं येवढा रणयोद्धा असतांना पत्रलेखेनें तुला अगदीं निर्बळाहून निर्बळ करून सोडलें आहे नां?

( इतक्यांत शकुनीदूत येतो. )

**शकुनी**—सेनापति महाराजांचा विजय असो.

**यौगंध०**—वाहवा! दूता तूं आलास? परचक्राचें काय वर्तमान आहे?

**शकुनी**—सेनापति महाराज आपण दैववान् खरे. आपलें कार्य अगदीं फत्ते झालेंच असें समजा. धर्मारण्यांत राक्षसांनीं धौम्यऋषीला व इतर तापसांना अत्यंत गांजून सोडलें आहे ह्मणून राक्षसांच्या संहाराकरितां धौम्यऋषिनीं दोन ऋषिकुमारही आपल्या वत्सराजमहाराजांकडे पाठविले आहेत. हा सर्व वृत्तांत मी गुप्त वेषानें संचार करून काढला.

**यौगंध०**—( आनंदानें ) वाहवा! वाहवा!! माझा मनोरथ आतां खास सिद्धीस जाणार. आतां त्या राक्षसांच्या संहारासाठीं मीच महाराजांच्या आज्ञेनं जातों, व आपला बाहुपराक्रम दाखवून त्यांना संतुष्ट करून पत्रलेखेला हां हां ह्मणतां उपटतों! ( तरवार पाजळून )

पद—( बिन सिके न है. ) ही चाल.

**आलें मला अतां अवसान् ॥**
**दाणादाण् हाणाहाण् रानोरान् कारि जाण् ॥**
**मला अतां० ॥ ध्रु० ॥**
**जिवलागि पत्रलेखा प्रिया प्रिया प्रिया ॥**
**तिजसाठीं खटाटोप सारा वांया वांया वांया ॥**
**तिजवांचुनी निदान् माझे प्राण् जाती जाण् ॥**
**माझी काया तिचे पायां वाहिलि मी याच ठायां ॥**
**थोर जिचि माया माया पत्रलेखा प्रिया प्रिया ॥**
**दाणादाण् हाणाहाण्० ॥ १ ॥**

बरं तर दूता, सैन्यांत जाऊन सर्व सैनिकांनां हुषार राहण्यास सांग.

**शकुनी**—ठीक आहे. ( मुजराकरून जातो. )

**यौगंध०**—माझा मनोरथ आतां खरोखरच सिद्धीस जाणार काय? पत्रलेखेच्या प्राप्तीसाठीं मला हा केवढा तरी व्यूह रचावा लागत आहे?

( एक पहारेकरी प्रवेश करितो.)

**पहारे०**—सेनापती महाराज, बाहेर एक स्त्री आली आहे व ती आपणास भेटूं इच्छिते.

**यौगंध०**--काय, स्त्री ? व माझी भेट घेऊं इच्छिते ? हें काय गूढ असावें बरें ? ही पत्रलेखा तर नसेलना ? पण ती येथें कशी येणार ? राणी वासवदत्तेनें तर तिला बंदिखान्यांत टाकिलें आहे. असो. बरं दूता तिला आंत पाठवून दे.

( पत्रलेखा हळू हळू पावलें टाकीत येते. यौगंधरायण तिजकडे पाहून ) अहाहा ! धन्य मी ! हीच ती पत्रलेखा ! ! काय ? मी स्वप्नांत तर नाहींना ? छे: छे: खरोखर हीच ती;

पद—( राग—वसंत )

**नव तारुण्यें ही मुसमुसली ॥**
**नितंबभारें कोमल कटितें पीडुनि गति**
**कुंठित केली ॥ ध्रु० ॥**
**करूनि सखीस्तव अति शोकाला ॥**
**वदन हिचें धरि पांडुर गाला ॥**
**अंगीं यौवनभर संचरला ॥**
**पुष्पित जणुं माधवि झाली ॥ तारुण्यें० ॥१॥**

पत्र०– ( आपल्याशीं ) हा मला आपल्या प्रेमपाशांत बद्ध करण्याला पाहतो आहे. परंतु प्रथमच याच्या प्रेमपाशांत न गुंततां जेणेंकरून प्रियसखीची भेट लवकर होईल अशा रीतीचें वचन याजकडून घेतलें पाहिजे. ह्मणून याचें प्रेमालाप प्रथमदर्शनीं मोठ्या युक्तीनें उडवून टाकिले पाहिजेत.

( उघड ) सेनापतिमहाराज, आपण आपल्या महाराजांप्रमाणेंच मोठे उदार, पराक्रमी आणि दीनांचे कनवाळु आहांत असं समजून मी आपल्याकडे कांहीं याचना करण्यास आलें आहे, तर त्याची माफी असावी.

यौगंध०—पत्रलेखे, असें अगदीं मनांत आणूं नकोस. तुझी याचना ऐकण्याचें तरी माझें मोठें भाग्यच ह्मणायचें. कारण, या यौगंधरायणानें आजपर्यंत एका असिधारेखेरीज कोणत्याही स्त्रीचा पक्षपात केला नाहीं. परंतु त्रिजगतालाही जिंकिणाऱ्या कामदेवाच्या पाशांत मी अखेरीस सांपडलों. तर पत्रलेखे, तूं जें जें ह्मणशील तें तें करण्यास मी अगदीं सिद्ध आहें.

पत्र०—[ आपल्याशीं ] याच्या या विषयपटु भाषणानीं जरी मला मोह उत्पन्न होतो, तरी शेवटपर्यंत आपण याला थांग लागूं देऊं नये हेंच बरं. [ उघड ] आपण खरोखरच कुमारकार्तिकेयासारखे ब्रह्मचर्यव्रत

ाकून खड्गलतेशीं एकपत्नीव्रत चालविणारे क्षात्रधर्म-
नेपुण आहांत हें सर्वविश्रुतच आहे.

**यौगंध०**—[ आपल्याशीं ] अरेरे ! या चतुरेनें तर
ाझ्या भाषणाचा ओघ अगदींच बदलून टाकला. तर
ातां हिच्याच अनुरोधानें चालावें हें बरें. [ उघड ] पत्र-
ेखे, तुझें कोणतें काम तें निःशंकपणें सांग. माझें तुला
ूर्ण आश्वासन आहे.

**पत्र०**—महाराज, माझी प्रियसखी प्रियदर्शिका, इला
ाणी वासवदत्तेनं—

**यौगंध०**—हर ! हर ! ! तुझ्या प्रियसखीला वनवास
ोगावा लागला हा वृत्तांत मला कळून चुकला आहे,
ा ह्मणून आपल्या सखीच्या विरहानें तूं अत्यंत कष्टी
ाली आहेस हें तुझें म्लान वदनच सांगत आहे. पत्र-
ेखे प्रियजनाचा वियोग कोणाला बरं दुःसह होत
ाहीं ? उदाहरणार्थ माझीच स्थिती पहा—

पद—[ सुविहित जहालें. ] ही चाल.

**अजवरि जरि मी समरिं शताह्वनि शत रिपु**
**ाधिले या खड्गानें ॥ ध्रु० ॥**
**परि तव विरहें सुंदरी मजला पीडुनि तवगे**
**ासाचि केलें ॥ अज० ॥**

पत्र०–( लाजून ) त्या चांडाळ विरहानें आपली ज्या-अर्थीं अशी स्थिति मजकरितां केली आहे, त्यांअर्थीं आपल्या चिरसहवासांत राहण्यास मीही फार उत्सुक आहे. परंतु, अगोदर प्रियसखीची व माझी भेट झाल्याखेरीज मी कोणतेंही अभिवचन देणार नाहीं.

यौगंध०–इतकें चनां ? ठीक आहे.

पद—( शंकराभरण )

पत्रलेखे तुला बैसवूनी रथीं रक्षकासहित मी पाठवीतों ॥
जाउनी काननीं प्रियसखी शोधुनी राहिं तेथें सुखें धौम्यसदनीं ॥
वत्सभूपाचिया अनुमतें त्याच वनिं असुरगणखंडना त्वरित येतों ॥
गाढआलिंगना दे अतां सुंदरी भेट तुजला पुन्हा त्वरित देतों ॥ पत्र० ॥१ ॥

( जातात. )

## प्रवेश तिसरा.

( गोंद्या, सटव्या व कांहीं गुराखी प्रवेश करितात )

गोंद्या—अर सटव्या, ए सटव्या, ल्योका हिकड ये कीं वेगी वेगी .

**सटव्या**—कार गोंद्या कशापायीं र वराड वराड वराडतुयास ?

**गोंद्या**—अर ल्योका ह्य बग, संमदी म्हसर नदीमंदी बसल्यात, आन् गाई बग त्या पल्याडल्या डुंगरावर चरत्याती तर ये मर्दा वाइच या आमराईत बसूनशेनि गान गाउं या. ( इतक्यांत दारूप्यालेला ह्मशा येतो. )

**सटव्या**—अर गोंद्या ह्यो बग ह्मशा कसा झिंगून आलाया ! कार ह्मशा, आज लई शिंदीवर हात मारलाया ? थू ल्योका, समूदी घान वरडाण सुटलिया तुझ्या त्वांडाला.

( नाकें मुरडतात - )

**गोंद्या**—खरंच कीर सटव्या !

**ह्मशा**—ह्य बग मर्दा, आज माझ्या कारभारनिनं मायंदळ शिंदी हंग मला पाजली. त्ये जाऊं दे ल्योका पन वाइच यथ बसून गान गाऊ या.

( गाऊं लागतात . )

गाणें ( कालियामर्दनाचें )

लई थोर यमुनच तीर ॥ तिच पानी काळभोर ॥
वाळुचं काळं वाळवंट ॥ लई झाडी हिंगणवेट ॥
तथ समूद मिळुन गोपाळ ॥ खेळतो नंदाचा बाळ ॥
आला पेंद्या मंग वरडत ॥ वाकड्या अला लंगडत ॥
आल्या समूद्या गोपि बिगीबीगी ॥ ठकु साळू आवडी

भागी ॥ लगुरिचा मांडिला डाव ॥ खेळे भागी यादवराव ॥ कोणि कुर्र घोडि चौपाई ॥ कोणि खेळति लंगडशायी ॥ कुनि हमामा घाली हमामा ॥ जय कुस्न बोलती नामा ॥ खेळती मंग इटिदांडु ॥ यकमेका मारती चेंडू ॥ गेला भिरिरि चेंडु कुस्नाचा ॥ टोमणा दिला दांडूचा ॥ कुसनाचा चेंडु मंग गेला ॥ कालिया डुहामधिं पडला ॥ कालियासरप लइ मोटा ॥ यमुनच्या डुहामधिंहोता ॥ कालिया आला धांवून ॥ कुस्नास धरी जाऊन ॥ तो धरुन मंग जग जेठी ॥ नाचला तयाच्या पाठी ॥ करून् कालियाचा मरदन ॥ श्रीकुस्न अला परतून ॥ १ ॥

( नंतर पत्रलेखा येते. )

पत्र०—वाटेच्या श्रमामुळं शिपाई लोक विश्रांती घेताहेत तोंपर्यंत या गुराख्यांना सखीबद्दल माहिती विचारावी.

गोंद्या—कार ह्मशा, त्ये काय दिसतया र? ल्योका भूताटकीन र भूताटकीन . अर ह्य बग इकडच येतीया.

सटव्या—अर थू ल्योका मुर्दाडा ! अर ती कोनी अस्तुरि व्हय अस्तुरि . ह्य बग काळ लुगड नेसलीया अन पायांत तोडवि घातल्याती .

ह्मशा—गोंद्या खरचकीर कुनी बायकु हाय. इचमन धरा इला. काय बव्रताया ?

गोंद्या—[ पुढें येऊन ]

लावणी [ कंगनीदार भरजरी ] ही चाल.

बिजलिगवानी लई चमकतिस कोन है तुझ
नी ॥ अशी फाकडी नार सोभशिल राजाची रानी ॥
शापायि हरनाचि छबकडी आलिस या रानीं ॥
गुन तुला लइ सुटलं अमच्या त्वांडाला पानी ॥१॥

सटव्या०—

लावणी— ( चाल सदर. )

कारभारिन माझि नेतुया तुला ग माझ्या घरीं ॥
जिरवानी लहान ठेंगनी दिसतिस तूं नारी ॥
ाड लई हुलग्याच माडग खाउन कर न्हेरी ॥
थ झुपक्याची घेतों तुला ग पातळ जरतारी ॥ १ ॥

पत्र०—( स्वगत ) हे लोक अगदीं रानटी असून फारच
ाडदांड दिसतात. तर यांच्या हातून आपला अपमान हो-
ाचा संभव आहे. ( उघड मोठ्यानें हांक मारिते )
रसेना, अरे वीरसेना, लवकर धांवत ये ! ( वीरसेन
तो व त्यास पाहून सर्व गुराखी घाबरतात. )

बाबानो, या वाटेनें एखादा रथ जातांना तुह्मी पाहि-
त कां ?

सर्व गु०—न्हाइ, न्हाइ, बामनिन.

**पत्र०**—हरहर! माझ्या प्रियसखीचं काय बरं झालं असावं? आतां तिचा शोध तरी कुठं लागेल? बाबानो, या अरण्यांत कोणाचा आश्रम तरी आहे कां?

**म्हशा**—व्हय्. व्हय्. त्या आस्रमामंदी बगा योक लांब दाडीचा बामन राहतुया. कार गोंद्या त्येच नांव काय?

**सटव्या**—त्येच? व्हय. व्हय. काय गड्या? हं हं हं धौम्या ह्मनताती त्येला.

**गोंद्या**—हंग व्हय त्येच.

**पत्र०**—बाबानो, तर चला आह्माला त्या आश्रमाकडे नेउन पोंचवा.

**सगळेजण**—व्हय, हकडून आमच्या पाठुपाठ या बामनिन. ( सर्व जातात. )

## प्रवेश ४ था.

( कंचुकी प्रवेश करितो. )

**कंचुकी**—इकडे तर ऋषिकुमार निरोप घेऊन आले आहेत, व इकडे आमचे महाराज तर राज्यकारभार सगळा टाकून देऊन विरहानें वेडे पीर बनले आहेत. त्यांतूनही ऐकलें कीं राणीला मत्सरभाव सहन न होऊन तिनें त्या राजकन्येला अरण्यांत सोडून दिलें. यानें तर त्यांच्या शोकसागराला

ास्तच भरती आली आहे. काय त्यांची अलीकडे दशा ाली पहा—

पद ( वसंतीं बघुनि ) ही चाल.

सुखानें झोंप न कधिं घेती ॥
ायनावरि लोळुनियां तळमळ तळमळ बहु करिती ॥
मृगया टाकुनियां देती ॥
ादासीन होउनियां क्रीडासौधावरि बसती ॥
पदोपदिं मूर्च्छित कीं होतीं ॥
ोकिलकूजित ऐकुनि कुंजीं अति विव्हल पडती ॥
त्यांची हीच असे रीती ॥
अंतःपुर सोडुनियां रजनी विरहें घालविती ॥ १ ॥

तर आतां शून्यहृदय झालेल्या आमच्या महाराजांना ऋषिकुमारांचा निरोप कसें तरी करून कळविला पाहिजे.—

( जातो. )

( वेत्रवती व राजा प्रवेश करितात. )

वेत्र०—इकडून असें यावें महाराज.

राजा—वेत्रवती, इथें सध्यां फार उष्मा होत आहे तर पुष्पवाटिकेचा मार्ग दाखीव.

वेत्र०—ठीक आहे सरकार, असें यावें. हा पहा आपला चिमणबाग.

**राजा**—वेत्रवती, हें शांतिस्थान पाहिल्या बरोबर मला किती तरी विसावा आला सांगूं ?

पद—( नभ मेघांनीं आक्रमिलें. ) ही चाल.

किति शीतल हा वायू वाहे ॥
उदासता मम जो हरिताहे ॥ ध्रु० ॥
नाजुक लतिकांना डोलवुनी ॥
नव कुसुमांचा सुगंध लुटुनी ॥
निदाघमन्मथतापा हरुनी ॥
मम गात्रांना सुख देताहे ॥ १ ॥

**वेत्र०**--महाराज, या माधवीलतामंडपाखालीं स्फटिकाचा चौरंग आहे. याजवर बसून महाराजानीं विश्रांती घ्यावी.

**राजा**—बरें तर तसेंच करूं या. ( बसून श्वास-सोडून ) वेत्रवती, दुःखीजनाच्या पुढें दुःखें कशीं हात जोडून उभीं असतात. पहा.

## साकी.

सुरभि जातिपुष्पांचा कामोद्दीपक परिमल आला ॥
मत्कामातें प्रदीप्त करूनी बोधितसे सखिस्मृतिला ॥
याच्या योगानें । झालीं चंचल मम भानें ॥ १ ॥

**वेत्र०**—महाराज, हे वृक्ष पहा, लतारूपस्त्रियां-बरोबर कसे आनंदानें वास करीत आहेत.

राजा—वेत्रवती, हें काय असेल बरें? या सुकुमार नवमालिकेला पाहिल्याबरोबर मला वाटतें कीं ती चारुगात्री वनांतून येऊन मजपुढें उभी राहिली आहे.

पहा—

पद--( सुवर्णकेतकी ) या चालीवर.

वाटे शाखा नव्हत या परी बाहुयुगल त्या रमणीचा ॥ किसलयरागा अवलोकीतां ओष्ठचि भासे तन्वीचा ॥ भ्रमरसमूह न असे खरा कीं केशपाश हा नील तिचा ॥ कुसुमांचा हा बहर नवतिचा वाटे भर तारुण्याचा ॥ भ्रमरमिषें वाटे कीं मजसी बोल बोलते प्रेमाचा ॥ लतारुपिणी प्रिया उभी ही सत्याचि होई ग्रह मतिचा ॥ वाटे० ॥ १ ॥

वेत्र०—महाराज, ही लता आहे.

राजा—हरहर! वेत्रवती, इतकावेळ मी काय आनंदांत होतों पहा—

पद. ( मजजवळि उभी ती बाला ) ही चाल.

भासली मला तरुणी ती ॥
मजपुढें उभी गे होती ॥
जणुं वदत मजसि ती होती ॥
सुखशैलिं करी मी वसती ॥ चाल ॥

या ऐन अशा समयाला ॥
घात तूं केला ॥ देउनि स्मृतिला ॥
ठरविलेंस हिस लतिकेला ॥
या ऐन अशा समयाला ॥ भासली० ॥

वेत्र०—महाराज, आपणासारख्या धनुर्धारी वीरांनीं धीर सोडूं नये. किती जरी मोठा वारा सुटला तरी मेरु-पर्वत कुठें डगमगला आहे कां?

राजा—

पद. ( दैवयोगदुर्विपाक. ) या चालीवर.

झडकरि ये शशिवदने भेट दे मला ॥
तव विरहें व्याकुल हा देह जाहला ॥ ध्रु० ॥
मूर्ति तुझी हृदयांतरिं चारु कोंदली ॥
त्वदधरमधुपानतृषा फार लागली ॥
मदनशरें मम गात्रें विकल जाहलीं ॥
तव शशिमुखदर्शनार्थ जीव शोषला ॥ १ ॥

[ मूर्च्छित होतो. ]

वेत्र०—महाराज, सावध व्हा, सावध व्हा. [ आपल्याशीं ] प्रियजनाचा विरह महाराजांना अजूनही पीडा देत आहे. [ राजा हळू हळू सावध होतो. ]

( इतक्यांत कंचुकी प्रवेश करितो. )

कंचुकी—महाराज, परमहंस धौम्यऋषिनीं आ-

पणाकडे दोन ऋषिकुमार कांहीं निरोप देऊन पाठविले आहेत.

**राजा**—वाहवा ! काय ? धौम्य महर्षींकडून आले आहेत ? बरें तर वैनतेया, जा आणि आपल्या माणवक पुरोहितांकडून त्यांचे आदरातिथ्य करून त्यांना अग्निशाळेंत प्रविष्ट कर. मी ही लवकरच येतों.

**कंचुकी**—आज्ञा महाराज.

( निघून जातो. )

**राजा**—वेत्रवतिके, मी ऋषींचा प्रसाद घेऊन येईपर्यंत तूं देवघरांत जाऊन माधवाचा संध्यापूजनविधी आटोपला असल्यास त्याला मी बोलावलें आहे ह्मणून सांग. चल तर, मला होमशाळेचा मार्ग दाखीव.

**वेत्र०**—असें इकडून यावें महाराज.

( जातात. )

---

# प्रवेश. ५ वा,

( स्थळ होमशाळा. )

[ मंदाक्ष व गालव, दोघे ऋषि-कुमार प्रवेशकरितात. ]

**मंदाक्ष**—मित्रा गालवा, तो राजार्षि अद्याप होमशाळेंत कां बरें येत नाहीं ?

**गालव**---मंदाक्षा, अरे या राजेलोकांना राज्य कारभारामुळें क्षणभरदेखील विश्रांती मिळत नाहीं. बहुतकरून तो दयाळु वत्सराजा धर्मासनावरून उठून इकडेच येत असावा.

**मंदाक्ष**---गालवा, मला ही कौशांबी नगरी केवळ अमरावतीच वाटत आहे. जसा त्या अमरावतींत महेंद्र राज्य करतो, तसाच या कौशांबी नगरींत हा महाबाहु वत्सराजा शोभतो. काय या राजधानीची शोभा? माझे तर डोळे अगदीं दिपून गेले.

**गालव**---मंदाक्षा, तसेंच पहा या राजाच्या होमशाळेंत हा वेदघोष कसा एकसारखा चालला आहे. मला वाटतें हा राजा सर्व राज्यकारभार संभाळीत असून देखील तपस्व्यां सारखाच संयमी आहे.

[ पडद्याकडे पाहून ]

**मंदाक्ष**---गालवा, हा पहा चतुःसमुद्रवलयांकितपृथ्वीचें पालन करणारा वत्सराजा नम्रवेषानें होमशाळेंत येत आहे.

[ राजा प्रवेश करितो. ]

**राजा**---आपणा उभयतांनां मी अभिवादन करितों.

**दोघे**---[ वर हात करून ]

दिंडी ( लीलांबरी. )

राज्यलक्ष्मी शत वर्ष भोगुनीया ॥
विजय संपादी बाहुबलें राया ॥
चक्रवर्ती सुत प्राप्त तुला होवो ॥
ईश तुजला बहु मंगलास देवो ॥ १ ॥

राजा—ऋषिमहाराज, आपले प्रथमाश्रमी भगवान धौम्य ऋषि कुशल असून आपल्या तापसक्रिया निर्विघ्न चालल्या आहेत ना ? ( मध्येंच घाबरून ) अरेरे !

साकी—

हिमक्लिष्ट नक्षत्रें तैशीं निस्तेज हिं मुनिवदनें ॥
पाहुनि मजला वाटे पीडित होइ तपोवन विघ्नें ॥
संशय मनिं येतो ॥ पहावें सत्य होइ कां तो ॥ १ ॥

मंदाक्ष—राजा, कसलें कुशल विचारतोस ? भगवान् धौम्यगुरूंनीं तुला अशी विज्ञप्ति केली आहे कीं—

पद— ( निज मख रक्षाया ) ही चाल.

शशिकुलदीपा सदया येई त्वरेनें ॥
वत्सपती भूपाला ॥ येई० ॥
शरण तुला मी दीन रिघालों ॥
रक्षण करि या संकटकाला ॥ ध्रु० ॥
राक्षस हे छळिती ॥ गांजीति ॥

हाल किती करिती ॥
तम दिनमणि हरि उज्वल किरणीं ॥
नाशी तेंवि तपोविघ्नाला ॥ १ ॥

गालव—पद-( चाल सदर )
शशिकुलवीरवरा उदारा ॥
ऋषिजनमोदकरा ॥
दीन अम्हां हे दानव ग्रासिति ॥
जलदापरि करि सुखवृष्टीला ॥ १ ॥

राजा—हा दुष्ट मदांधांनो, आत्तां पहा तुम्हांला नाहींसें करून टाकतों. ऋषिमहाराज, आपण कांहीं विशेष काळजी करूनये.

मंदाक्ष—राजा,

दिंडी—[ लीलांबरी. ]
साह्यकर्ता तूं असुनि महेंद्राचा ॥
विघ्न नाशाया बली कोण साचा ॥
सृष्टितिमिरातें प्रथम हरायार्थ ॥
अरुणवीराविण अन्य नच समर्थ ॥ ॥ १ ॥

गालव—हे महाभागा, तूं महेंद्राहून कांहीं कमी नाहींस. पहा—

पद—( शशिकुलभूषण गुणवंता ) ही चाल.
जो तूं जगता सुखधामा ॥ वर्णूं काय तुझा

महिमा ॥ वासव सुरलोकीं जैसा ॥ महिवरि राज्य करिसि तैसा ॥ चाल ॥ सागरवसनाअवनीचा तूं ॥ संचितसद्धर्मा ॥ भर्ता शोभसि शुभकर्मा ॥ १ ॥

राजा—ऋषिवर्य, मी या स्तुतीला मुळींच पात्र नाहीं.

दोघे—राजा, हा विनय तुझ्या कीर्तिला फारच शोभतो.

राजा—ऋषिवर्य, आतां स्वस्थ असावें.

साकी

रणीं वधिन निजबाहुवलानें मी त्या असुरंगणाला ॥
ते दिनिं देइन विश्रांतीतें धनुच्या प्रत्यंचेला ॥
आश्वासन घ्यावें ॥ कांहीं भय नच मानावें ॥ १ ॥

दोघे—हे राजा, आतां तुला शेवटचें इतकेंच सांगणें आहे कीं-

पद ( येतसे मधुर ध्वनी ) ही चाल

येवोनि अमुच्या वनीं ॥ राजा धनुर्बाणी ॥ वधुनी टाकी ॥ रिपूंना ॥ ध्रु० ॥ बहु आम्हां त्यांनीं गांजियलें ॥ जीव अमुचे नकोसे केले ॥ गुरु धौम्य बहू घाबरले ॥ ये तपोवनीं । राजा धनुर्बाणी ॥वधुनी०॥

राजा— पद—चाल सदर.

शर धनुतें पहा लावीतों ॥ असुरांचें बळी

**पाडीतों ॥ अपणां सुखशांती देतों ॥ जा तपोवनीं ॥ अपुल्या मागोनि ॥ येतों पहा मी त्वरेनें ॥ २ ॥**

**मंदाक्ष**—राजा, आम्ही आतां तपोवनाला जातों तूं लवकर ये.

**राजा**—ऋषिवर्य, त्या आपल्या पुण्याश्रमपदांत मी आपलें धनुष्य सज्ज करून लवकरच येतों पहा.

**दोघे**—ठीक आहे. जातो तर. तुझा विजय असो.

( ऋषिकुमार गेल्यावर विदूषक येतो. )

**विदू०**—हा पहा माझा मित्र होमवेदिकेजवळ उभा आहे ; तर आतां त्याच्या जवळ जावें. मित्रा तुझा विजय असो !

**राजा**—महाब्राह्मणा, आलास, तुझें कुशल आहेना ?

**विदू०**—होय. पण नुक्तेंच येऊन गेलेल्या ऋषिकुमारांनीं तुजवर कोणता अनुग्रह केला ?

**राजा**—हा प्रश्न तूं करशील असें मला आधींच वाटलें होतें. ( खेदानें ) मित्रा काय सांगू ? मी पापकर्मा असल्यामुळें देवशत्रू जे दानव त्यांनीं तपोवनवासी ऋषींचे नाना छळ मांडिलें आहेत व या करितांच धौम्यऋषीनीं ऋषिकुमार मजकडे पाठविले होते. समजलास ?

**विदू०**—( स्वगत ) याचं मन त्या पिशाचिकाऽयाधीनं जरी घेरून टाकलं आहे, तरी प्रजापालनीं याचीं केवढी ही

तत्परता ? ( उघड ) मित्रा, अरे ऋषींवर संकट आल्यामुळं तूं आपल्या स्वतःला काय ह्मणून दूषण लावतोस ?

**राजा**—अरे ऐक—

## साकी.

**काला कारण सर्वथैव ते । भूपति सततचि असती ॥**
**ऐसें पूर्वज स्मृतिमदृषिजन । निजलेखांतीं लिहिती ॥**
**नमुनि तयां भावें । वच तें सत्याचि मानावें ॥ १ ॥**

**विदू०**—मी तर असं समजतों कीं असं लिहिणारे ते लांबलांब दाढीचे सारे ऋषी शुद्ध लपुटशंख सोटभैरव होते. त्या बेट्या गांवढळांनीं कांहींतरी लिहून ठेवलं आहे झालं.

**राजा**—मित्रा, त्या पुण्यराशी ऋषींचा उपहास करूं नकोस.

**विदू०**—तर मग आपला विजयरथ आतांच सिद्ध होणार कीं काय ?

**राजा**—होय. कोण आहे रे तिकडे? शूद्रका, सारथीला आमचा विजयरथ सिद्ध करून आणण्याला सांग. व सान्या अंतःपुरांत जाऊन खबर दे कीं, शत्रुपारिपत्यासाठीं आह्मी आतांच सैन्यासह कूच करणार. व सेनापतीलाही मजकडे पाठवून दे. [ पडद्यांत " जी सरकार " ] ( विदूषकास )

कां माधवा, आमच्या बरोबर तपोवनाला येण्याची इच्छा आहे कां ?

**विदू०**---[भयानें] छे ! छे ! नकोरे बाबा, त्या ऋषि-राक्षसांच्या युद्धाला इथूनच माझा कोंपरापासून नमस्कार असो. हें पहा मित्रा, यज्ञाच्या बोकडाला जसें बुकलून बुकलून मारतात तसे ते बटकीचे राक्षस माझे हाल हाल करून मारून टाकतील. मग या गरीब ब्राह्मणाला फिरून घृतकल्या मधुकल्या दुसऱ्या जन्मीं कुठून मिळतील ? तुलाही चारशब्द सांगावयाचे आहेत. ऐकशील तर—

**राजा**—हो हो, जर सयुक्तिक, ऐकण्यासारखें असेल तर ऐकेन. सांग.

**विदू०**---अरे, हें पहा त्या ऋषिराक्षसांच्या भांडणांत पडून काळकूट विषासारख्या युद्धाचा विनाकारण खटाटोप कशासाठीं करतोस ? मरेनात ते ऋषी आणि राक्षस ! आयतें चांदणें टाकून देऊन मुद्दाम रखरखीत उन्हांत जाण्याची बुद्धी तुला कोठून झाली बाबा ?

**राजा**—अरे, असें पहा—

पद ( पार्था तुज देउनी ) ही चाल.

**तपाचा षष्ठभाग देती ॥ ह्मणुनी तत्सेवक भूपती ॥**
**सकला जगतावरि करिती ॥**

**अनुग्रह पुण्यतपोमूर्ती ॥ गूढतपोबल ते असती ॥**
**वरुनी जरि शमधन दिसती ॥**
**तद्रक्षण कां न करावें ॥**
**विमल यशा कां मळवावें ॥**
**पुण्य तपोमूर्ती ॥ ह्मणुनी० ॥ १ ॥**

**विदू०**—तुझा जर जाण्याचा आग्रहच असेल, तर बरेच दिवस पुरणारें फराळाचें तरी बरोबर घेऊन जा. नाहींतर तेथें गेल्यावर ऋषींच्या आश्रमांत नवीन प्रसूत झालेल्या हरिणीसाठीं शिजविलेल्या नीवारपाकाचा चतुर्थांश भक्षण करून तुला रहावें लागेल. त्या बेट्या डोकीला हिंगणबेटाचं तेल माखणाऱ्या, वारा खाऊन पाणी पिणाऱ्या दिगंबर ऋषींजवळ दुसरं काय मिळणार ?

**राजा**— [ हंसून ] वाहवा, केवढी तरी मोठी काळजी ? बिचाऱ्याला स्वतःला जसें अन्नमय जग दिसतें, तशीच सर्वत्रांची स्थिति समजतो झालें !

( एक दासी प्रवेश करिते. )

**दासी**—महाराज, आपण तपोवनांत जाणार असें राणीला समजल्यावरून त्यांनींही आपल्या बरोबर येण्याचा निश्चय केला आहे. तर महाराजांची काय आज्ञा आहे ?

**विदू०**—मित्रा, ही साडेसाती तुझ्या मागें पक्की लागली समज.

**दासी**—कां भडजीबुवा, तुमची जीभ एवढी वळवळ कां करिते? ही राणीची निंदा त्यांना जाऊन सांगूं वाटतं. मग मात्र मेल्याचं चांगलं कांडात् निघेल !

**राजा**—चतुरिके, देवीला जाऊन कळीव कीं, तुम्हांसारख्या नाजुक स्त्रियांना युद्धपरिश्रम कशालापाहिजेत? त्यांतूनही जर राणीची समरकर्म पाहण्याची आतुरता असेलच तर आमच्या बरोबर रथांत बसून चलावें, असें सांग जा.

**दासी**—जशी महाराजांची आज्ञा ( जाते. )

**विदू०**—मित्रा, राणीचा तुजबरोबर येण्याचा खरा मतलब समजलास कां ?

**राजा**—खरेंच नाहीं समजलों. सांग बरें !

**विदू०**—अरे, हें पहा. ऋषिकार्याचें निमित्त करून तूं प्रियदर्शिकावहिनीच्या शोधाकरितां अरण्यांत जात असशील ह्मणून ही बरोबर येण्याची तिनें युक्ती काढली.

**राजा**—हा मूर्खा, या युद्धप्रसंगीं ही प्रेमकथा काढण्याला तुला लाज कशी नाहीं वाटत?

**विदू०**—अरेरे, हें काय लचांड झालें ? [ पडद्यांत घांटेचा आवाज होतो ] अरे मित्रा, या घांटेच्या घणघण आवाजावरून तुझा रथ सज्ज झाला वाटतें.

**राजा**—ठीक आहे तर,

## ओंवी.

**माझा कोदंड सज्ज करितों ॥**

सकलां राक्षसां बळी पाडितो ॥
दीन ऋषींचे प्राण रक्षितों ॥
प्रत्यंचा पहा झाडिली ॥ १ ॥

( इतक्यांत यौगंधरायण घाई घाईनें येतो. )

**यौगंध०**—हां! हां!! महाराज, आज एकाएकीं असें धनुष्याचें विस्फारण करून प्रत्यंचा झाडण्यासारखा कोणता दुर्धर प्रसंग महाराजांवर आला आहे? हा दास सेवेस तयार आहे.

**राजा**—यौगंधरायणा, ब्रह्मारण्यवासी ऋषींनां राक्षसांनीं फार गांजलें आहे, तर त्यांच्या विध्वंसासाठीं धौम्य महर्षींच्या आज्ञेवरून मी हा आतांच चाललों.

**यौगंध०**—महाराज, जोंपर्यंत आपल्या पिंडानें पुष्ट झालेला हा यौगंधरायण आपणाजवळ आहे, तोंपर्यंत शत्रुपारिपत्याचे आपणास वृथा श्रम कशाला? आज्ञा होण्याचा मात्र उशीर, कीं हा मी दुष्टांचा समाचार घेण्यास एका पायावर सिद्ध आहे.

**विदू०**—अरे मित्रा, या गेलेलट्टालाच जाऊंदे एकट्याला कसा. हं. परस्परं समर्पयामि!

**राजा**—यौगंधरायणा, ज्याअर्थीं भगवान् धौम्य ऋषींची प्रत्यक्ष मला आज्ञा झाली आहे, त्या अर्थीं या प्रसंगीं मला गेलेंच पाहिजे.

**यौगंध०**—निदान स्वामिचरणाबरोबर येण्याची तरी मला आज्ञा व्हावी.

राजा—ठीक आहे. युद्धांत मला तुजपासून बरेंच सहाय्य होईल तर मजबरोबर चलावें.

यौगंध०—हा मी स्वामीबरोबर येण्यास सिद्ध आहे. [ आपल्याशीं ] पत्रलेखेला वचन दिल्याप्रमाणें धर्मारण्यांत जाण्याचा बेत तर सुदैवानें एकदाचा जुळलाच. यावरून माझा मनोरथ सफळ होणार असा आशांकुर मनांत उद्भवतो. [ उघड ] महाराज, आयुधागारांत जाऊन मी सशस्त्र होऊन प्रवासास सिद्ध होतों.

राजा—ठीक आहे. [ यौगंध०—जातो. ]

विदू०—मित्रा, तुझा विजयरथ केव्हांपासून सिद्ध होऊन दारीं उभा आहे. तर आतां उशीर कां? तुझा विजय असो. ऋषींचा प्रसाद घेऊन लवकरच परत ये.

राजा—ठीक आहे. माधवा,—

## साकी.

तपोवनाप्रति जातों आह्मी रक्षोगणसंहरणीं ॥
ऋषीजनांचें इष्ट करोनी येउं त्वरें परतोनी ॥
तोंवरि तूं सदनीं ॥ रहावें न करी खेद मनीं ॥ १ ॥

[ जातात. ]

अंक चवथा समाप्त.

# अंक पांचवा.

## प्रवेश १ ला.

[ गालव व मंदाक्ष प्रवेश करितात. ]

**गालव**---मित्रा मंदाक्षा, आज एवढ्या घाईघाईनें कुठें चालला आहेस ?

**मंदाक्ष**---गालवा, धौम्यगुरुंनीं मला सांगितलें आहे कीं उद्यां वत्सराजा राक्षसांचा पराभव करण्याकरितां आपल्या तपोवनांत येणार आहे. तर त्याच्या सैन्याची नीट व्यवस्था ठेवावी असा निरोप तमसावनदेवतेला सांगून ये. ह्मणून तिच्याकडे जात आहे.

**गालव**---मित्रा मंदाक्षा, तो सत्यवचनी, पराक्रमी राजा आल्याबरोबर आपली सर्व संकटें दूर होऊन धौम्यगुरुंना रात्रंदिवस लागलेली काळजी नाहींशी होईल.

**मंदाक्ष**---अरे त्यांना एक का काळजी आहे ? आपल्या आश्रमांत आज बरेच दिवस वास करणारी व धौम्यगुरूंना पोटच्या मुलीसारखी प्राणाहून प्रिय झालेली, अशी ती प्रियदर्शिका---

**गालव**---खरंच मित्रा मंदाक्षा, मी तुला विचारीन वि-

चारीन म्हणून ह्मणत होतों. अरे ही प्रियदार्शीका कोणा-ची कोण ? व ही राजकन्येसारखी दिसत असून हिच्या कपाळीं हा वनवास कां आला ? तूं नेहमीं गुरूजींच्या अगदीं निकटसेवेंत असतोस ह्मणूनच तुला विचारायाचें ?

मंदाक्ष—ऐकतर.

पद—( नच दृष्टीस पडती ते ) ही चाल.

अंगनृपति दृढवर्मातनुजा हीच असे दर्शिका ॥
स्वरूपें लाजवि जी मेनका ॥
कलिंगराजें हीचे पाणिग्रहणा प्रार्थियलें ॥
परि त्या भूपें नच ऐकिलें ॥
निश्चय त्याचा सुता आपुली द्यावी वत्साला ॥
ऐकुनि कलिंग बहु तापला ॥
या भीतीनें स्वसुता भूपें विंध्यकेतुसदनीं ॥
धाडिली वयस्य प्रिय जाणुनी ॥
वत्सनृपानें तुंबळ समरीं विंध्यकेतु जिंकुनी ॥
आणिलें दार्शेकेस हरुनी ॥
परस्परांचें प्रेम वाढलें रूपगुणा मोहुनी ॥
राज्ञी कुपित जाहली मनीं ॥
रक्षकहस्तें रथीं घालुनी धाडिलि इजला वनीं ॥
आली याच वनीं निर्जनीं ॥

**गालव**—हरहर ! काय त्या बिचारीवर संकट ओ-ढवलं तरी ? पुढें.

**मंदाक्ष**—पुढें, मी एकदां दूर्वासमिधा आणण्याकरितां तपोवनांत गेलों असतां या बिचारीचा आक्रोश मी ऐकिला. ह्मणून जवळ गेलों तेव्हां तिनें अति दीन स्वरानें आपली स्थिति मला सांगीतली. त्यावरून मला अति वाईट वाटून मी तिला गुरूंजींकडे घेऊन आलों. तेव्हां त्या वत्सराजाची भेट मला पुन्हां लवकर करून द्या, नाहीं तर मी आपले प्राण ठेवणार नाहीं असा प्रियदर्शिकेचा हट्ट पाहिल्यामुळें गुरुजींना रात्रंदिवस काळजी लागली होती. परंतु—

**गालव**—परंतु ह्मणजे ?

**मंदाक्ष**—परंतु, प्रियदर्शिकेच्या दैवानेंच ह्मणायाचें, तो राजा अनायासानें दानवसंहाराकरितां उद्यां तपोवनांत येणार आहे त्या वेळेस हा चंद्ररोहिणीयोग आयताच जुळून येईल.

**गालव**—वाहवा ! असें होईल तर—

## साकी.

**सुदैव फळुनी विरहकाल तो सरला राज तेचा ॥ सागरमंदाकिनिसंगम हा होइल फार**

सुखाचा ॥ राजसुतेवरि ती ॥ गुरुची सत्य असे प्रीती ॥ १ ॥

बरें तर मंदाक्षा, मी दर्भसमिधा आणायला जातों. तूं, ही आनंदाची बातमी प्रियदर्शिकाताईला जाऊन सांग.

( प्रवेश १ ला समाप्त. )

——:००:——

## प्रवेश २ रा.

( उदासीन झालेली प्रियदर्शिका पत्रलेखेसह पडद्यांतून गात गात येते. )

प्रिय०—

पद–( माझा भरत दे० ) ही चाल.

सखये प्राणसखा मजला ॥
पुनरापि भेटेल ना ॥ ध्रु० ॥
सरुनी राणीचा संताप ॥
अथवा पूर्वजन्मिचा शाप ॥
देवा हरुनी हा हृत्ताप ।
माझा व्याप नेशिल ना ॥ १ ॥
झाला व्याकुळ हा मम जीव ।
माझा जिवलग तो दाखीव ॥
माझी दुबळीची मानिं कींव ॥
भगवंता येइल ना ॥ २ ॥

पत्र०—गडे, असा किती तरी आक्रोश करशील ? हें
ı, तुझ्या या शोकानें हे तपोवनतरू देखील अश्रू
ळीत आहेत. मग माझी अवस्था काय होत असेल
ची तूंच कल्पना कर. ही पहा ऐन दुपारची वेळ आहे.
ून रडून पित्त भडकेल आणखी भलतीच विकृति मात्र
ईल. ह्मणून ह्मणतें गडे, अंमळ शांत हो ! तुझी ही अली-
डची स्थिति पाहून धौम्यबाबानां देखील कितीतरी
ाळजी लागली आहे सांगूं ? ते परवां मला असें ह्मणाले,—

प्रिय०—गडे खरंच कायग ? मग काय ह्मणाले तें ल-
कर सांग बरं.

पत्र०—ते म्हणालें कीं, ही रोहिता हरिणी जेव्हां गर्भि-
ी होती, तेव्हां तिची सुखरूप सुटका केव्हां होते याची
ला जेवढी काळजी होती त्याच्या दुप्पट काळजी प्रिय-
र्शिकेला वत्सराजा पति पुन्हा कसा मिळेल या विषयीं
ात्रंदिवस लागली आहे.

प्रिय०— हे वेडया हृदया ! सुखदुःखाच्या मिश्रित
ारंगांनीं कितीतरी मला छळशील ?

पद—( मना तळमळसी. ) याचालिवर.

जिवा कां झुरशी ॥
व्यर्थ हिला कां रे छळिशी ॥

करुनि विरहासी ॥ ध्रु ॥
दुर्लभ पुरुषा इच्छुनि ऐसा ॥
निराश कां मग होशि ॥ करुनि॥ ० १ ॥
फिरुनि अशा या सुखवार्तेनें ॥
धीर कासया धरिसि ॥ करुनि० ॥ २ ॥

पत्र०—गडे, अशी अधीर होऊं नकोस. ब्रम्हदेवानं तुझ्या कपाळीं जर वत्सराजा पती लिहिला असेल तर धौम्यगुरूंच्या कृपेनं तुझे मनोरथ सफळ होतील.

प्रिय०—गडे, या अभागीच्या कपाळीं जर सुख मिळायचं असतं तर असं दुर्दैव कां ओढवतं ?

पद—[ अरसिक किति हा ] ही चाल.

हेतु मनींचा फसला ॥
इष्ट मनोरथ भग्नाचि झाला ॥ ध्रु० ॥
ऐनाचि त्या समयाला ॥ यावी कां ती राणी कुटिला ॥
धाडुनि मजला वनाला ॥
घात तिनें बघ कैसा केला ॥
आशातंतू तुटला ॥
काय करूं मी दुर्दैवाला ॥
माझा जिव हुरहुरला ॥
मी कष्टुनि गेलें वनवासाला ॥
नलगे जिव हा मेला ॥ १ ॥

पत्र०—अग, ज्या दैवानं तुला त्या राजाचा एकदां संगम
रून दिला, तेंच दैव पुन्हां उभयतांची गांठ घालून देईल.
ा, ही वसंत ऋतूची शोभा तरी पाहिलीस का ?—

पद—( रतिविहार गंगेमाझारीं ) ही चाल.

ऋतु वसंत शीतळकारी गे ॥
बघ फुलले तरु हे भारी ॥
कोकिला गाति नर नारी गे ॥
अति मंजुळ पंचम सूरीं ॥
किति मधुर आम्रमंजीरी गे ॥
घमघमाट सुटला भारी ॥
बघ आंबराइ सुखकारी गे ॥
घनगारचि छाया सारी ॥
किति कुसुमतरू मधुधारी गे ॥
बघ फुलले अपुल्या दारीं ॥
जणु वसंत ऋतुची नारी गे ॥
नेसली शालु जरतारी ॥ १ ॥

प्रिय०—सखे,

पद—[ बघुनि उपवना ] ही चाल.

वसंत ऋतु हा जरि रमणीय तरी ॥
विपरित माझी स्थिती ॥
मडकुनि कामाग्नी व्याकुल हे प्राण गडे होती ॥

**मत्त कोकिला वसंत आला ऐशा शब्दीं किती ॥**
**दुःखित माझ्या हृदयावरि गे डाग सखे देती ॥**
**॥ चाल ॥ हाआम्रमंजरीशर स्मर धरि मजवरी ॥**
**हा मलयसमीरण शूल करी मम शिरीं ॥**
**कोकिळा हि वाटे केवळ वैरिणिपरी ॥**
**॥ चाल ॥ या सर्वांच्या भडिमारानें ॥**
**घाबरि मी होतें ॥ विरहानलिं या जगण्या-**
**हुनि गे मरण बरें वाटतें ॥ १ ॥**

**पत्र०**—अगबाई, हिचा हा रोग फारच वाढत चाललासा दिसतो. ( उघड ) गडे, हें पहा मला एक युक्ति सुचली आहे ती सांगूं कां ?

**प्रिय०**—मी तुला कधीं तरी प्रतिबंध केला आहे का ? मग अशी नवख्यासारखी काय विचारतेसती ? आपले देह जरी दोन आहेत तरी जीव एकच आहे. सांग बरं तुला कसं वाटतं?

**पत्र०**—गडे, मला असं वाटतं कीं तूं आपल्या विरहाचे आशयाचा मदनलेख लिहून मजजवळ दे, म्हणजे मी तो आश्रमांतील ऋषिकुमाराचे हातीं प्रसादाच्या मिषानें राजाकडे पाठवीन.

**प्रिय०**—अहाग वेडे, म्हणजे आयतीच चोराच्या हातांत जामदारखान्याची किल्ली दिल्यासारखं होईल.

ण तो लेख जर दैववशांत राणीच्या हातीं पडला तर याहूनही मोठें अरिष्ट आपणावर येईल.

पत्र०—हें पण खरंच. आतां कसं करूं? गडे एव- र कायतो माझा उपाय होता.

प्रिय०—

## अंजनीगीत.

चिंतामणि जो मम करिं आला ॥
तो दुर्दैवें हरुनी नेला ॥
काय करिशि तूं सखे तयाला ॥
हीन दैव माझें ॥ १ ॥

पत्र०—सखे, अशी उदासीन होऊं नको. कुलदेव- ांच्या आशिर्वादानं सर्व मनोरथ पूर्ण होतील.

( इतक्यांत मंदाक्ष येतो )

**मंदाक्ष**—केवढें हें प्रियदर्शिकेचें दैव ह्मणायचें कीं, ो महापराक्रमी वत्सराजा उदईक तपोवनांत येणार आहे, ही आनंदाची वार्ता आज गालवानें मला सांगि- तली. बिचारी प्रियदर्शिका त्या राजाच्या विरहानें कशी झुरणीस लागली आहे! ही पहा प्रियदर्शिका पत्र- लेखेसह एकांत कांहीं बोलत बसली आहे, तर तिला हा वृत्तांत सांगावा.

**प्रिय०**—बाळा मंदाक्षा, आज इतक्या घाईघाईनें कां आलास ?

**मंदाक्ष**—ताई, उद्यां वत्सराजा राक्षसांच्या संहाराकरितां आपल्या तपोवनांत येणार आहे ही आनंदाची वार्ता तुला सांगण्यासाठीं घाईघाईनें आलों.

( प्रिय० आनंदित होऊन एकीकडे उभी राहते. )

**पत्र०**—मंदाक्षा, ग्रीष्मतापानें मरणोन्मुख झालेली माधवीलता मेघवृष्टीनंतर जशी टवटवीत होते तसें या आनंदवार्तेनें माझ्या मैत्रिणीच्या मनाला किती तरी धीर आला ?

**प्रिय०**—हृदया, एका नांवासारखीं पुष्कळ नांवें असतात, ह्मणून प्रत्यक्ष खात्रीकरून घेतल्याशिवाय उगीच कां उड्या मारतोस ?

**मंदाक्ष**—पत्रलेखे, खरेंच पहा,

## साकी.

पतिसंगमआशा मनिं उपजुनि आनंदें ही
भरली ॥ सौदामिनि मेघाशीं तेंवी कांतो-
त्सुक ही झाली ॥ आला धीर हिला ॥ वाटे
सर्व ताप गेला ॥ १ ॥

आतां मी गुरुजींच्या संध्येची तयारी करण्या करितां जातों.

**पत्र०**—सखे प्रियदर्शिके, आतां तरी या पत्रलेखेच्या भविष्यावर विश्वास ठेवशीलना? आतां चंद्ररोहिणीयोग लवकरच जुळून येईल.

**प्रिय०**—गडे, असें बोलून बोलून मला आतां कितीतरी लाजिवशील? चल तर. बाबा आश्रमांत आपली वाट पहात बसले असतील. केव्हांच्या आपण पुष्पवाटिकेंतच बसलों आहोंत? हा पहा सूर्यनारायण अस्ताचलीं चालला.

**पत्र०**—अग, तो जरी अस्तास जात आहे तरी याहून निराळाच एक सूर्यनारायण उद्यां या तपोवनांत उगवणार आहे बरं?

**प्रिय०**—हें काय बाई? जिथे तिथे तुझी मेली आपली थट्टाच सारी! पत्रलेखे हा चमत्कार पहा. सूर्यास्ताबरोबर या कमलिनीची कशी स्थिती झाली ती ही देखील बिचारी मजसारखीच तपस्विनी झाली. पहा—

पद. [ स्फटिकांचे हे पदपथ. ] ही चाल.

**दिनिं सुखवूनी निजकांतेला ॥**
**सहस्ररश्मी अस्ता गेला ॥ ध्रु० ॥**
**संध्यावल्का धरी भृंगतती ॥**
**रुद्राक्षांची करुनी माला ॥**
**निजपतिप्राप्तीसाठीं करिते ॥**
**पहा पद्मिनी उग्र तपाला ॥ दिनिं० ॥**

**पत्र०**—अग, बोलण्याच्या नादांत कितीतरी आपल्याला उशीर झाला ? या पहा आंधारानें दिशा व्याप्त होत चालल्या आहेत. ह्मणून ह्मणतें लवकर लवकर पाउलें टाक !

**प्रिय०**—अग पण हो ! हा कितीतरी काळोख पडला आहे ?

**पद.** [ इसतन धनकी. ] ही चाल.

**हळुहळु चाल सखे गे जपुनी ॥**
**अंधारानें न दिसे नयनीं ॥**
**विखुरलि वातें माझी वेणी ॥**
**पदरहि गेला सारा सुटुनी ॥ हळुहळु० ॥१॥**

[ जातात. ]

---

## प्रवेश २ रा.

**मंदाक्ष**—किती तरी आज मला या वत्सराजाच्या पराक्रमानें आनंद होत आहे पहा—

पद [ शंकरा भरण ]

**धौम्यगुरु आज बहु पावतिल शांतिला ॥**
**राक्षसांचा अतां काळ सरला ॥ ध्रु० ॥**

**मारुनी संगरीं दुष्ट दानवगणा ॥**
**वत्सराजा पहा विजयि झाला ॥**
**देवदेवांगना खालती वर्षती ॥**
**अंबरांतूनि या पुष्पमाला ॥ धौम्य० ॥ १ ॥**

अरे हो पण! काय तरी आश्चर्य कीं, वत्सराजाबरोबर राणी वासवदत्ता देखील आली आहे!! शर्थ आहे तिच्या मत्सरीस्वभावाची. युद्धाचें ढोंग करून कदाचित् राजा प्रियदर्शिकेच्या शोधासाठीं वनांत जाईल असा संशय तिला येऊन ती आपली आज राजाबरोबर युद्धांत देखील रथांत बसलेली होती. बिचाऱ्या प्रियदर्शिकेच्या सुखाला ही विघ्नदेवताच आली ह्मणायची! पण धौम्यगुरुजी प्रियदर्शिकेचे पूर्ण पाठराखी असतांना तिचे मनोरथ सफल झालेच पाहिजेत. असो, ही बातमी आतां धौम्यगुरूंना जाऊन सांगूं या.

[ जातो. ]

( आसनस्थ धौम्य ऋषि प्रवेश करितो. )

**धौम्य**—( उत्कंठित होऊन. )

पद [ असावरी ]

**कांहिच ना कळलें ॥ मजला ॥ ०० ॥**
**वत्सराज वनिं येउनि दानवयुद्ध चालु झालें ॥**

परि त्या भूपें नकळे राक्षस समरीं संहरिले ॥
मजला० ॥ १ ॥
असुरांच्या तापें जपतप हे निरुद्ध कीं झाले ॥
या चिंतेनें निशिदिनिं माझें हृदय कसें पोळे ॥
मजला० ॥ २ ॥

तर आतां ती समरवार्ता केव्हां कळेल अशी उत्कंठा मला लागली आहे.

गालव—( प्रवेश करून ) गुरुजी! अहो गुरुजी! असे चिंताक्रांत काय बसलांत? त्या महाविक्रमशाली वत्सराजाला जय मिळाला ही आनंदाची बातमी तुम्हांला सांगण्याला मी मुद्दाम पळत पळत आलों. पहा,

ओंवी.

जैसा कमलें मत्त वारण ॥ शुंडाग्रें दे नभीं फेकून
तेंवी राक्षसमस्तकें छेदून ॥ वत्सभूपें टाकिलीं ॥१॥

धौम्य—( हर्षानें ) वाहवा!

पद ( भैरवी )

काय वदावें मी या समयीं ॥
चिंता कांहीं उरली नाहीं ॥
ममहृदयींचें शल्यचि मोठें ॥
झपटुनि आज निघालें वाटे ॥ १ ॥

**गालव**—गुरुजी, वीर्यशाली वत्सराजाच्या मनुष्याचा टणत्कार ऐकल्याबरोबरच राक्षसांनीं पळ काढला पण त्या राजानें खड्गास्त्र सोडून त्या सर्वांचीं शिरकमलें छेदून टाकिलीं.

**धौम्य**—बाळा गालवा, अशा त्या परोपकारी वत्सराजाच्या दर्शनाची उत्कंठा मला फार लागली आहे.

पद ( पाहिन सिंहासनिं ) ही चाल.

**बघिन तया मी कधिं राजेंद्रा ॥उत्सुकता मज भारी ॥ ध्रु० ॥ वधुनि असुरगण बाहुबलानें ॥**
**देई तपोवन शांती ॥१॥ नभिं दुंदुभि ही वाजे ज्याची ॥**
**सुरवर गाती कीर्ती ॥२ ॥**

**गालव**—गुरुजी, तमसा वनदेवतेचा पाहुणचार घेऊन वत्सराजा इकडेच येत असेल.

**धौम्य**—गालवा, ज्यानें दुष्टांचा संहार करून आपल्या तापसक्रिया निर्विघ्न केल्या त्या राजावर कोणता अनुग्रह करावा या मी चिंतेंत आहें.

**गालव**—खरेंच गुरुजी, वत्सराजाला आपण कोणता प्रसाद देऊन संतुष्ट करणार?

**धौम्य**—अरे, ऐक सांगतों.

पद. भैरवी.

हृदयीं चिंति सदां मी ॥ गालवा ॥
दर्शिकेस पति वत्सचि नामी ॥ ध्रु० ॥
वत्सराज हा मन्मथसुंदर ॥
इजला शोभे उचित असा वर ॥
चंद्ररोहिणी योग्य जुळे तर ॥
वास करिन मी मग सुखधामीं ॥ गालवा ॥ ध्रु० ॥

**गालव**——गुरुजी, हें कांहीं उघड सांगायला नको. प्रियदर्शिका ह्मणजे तुमच्या गळ्यांतला ताईतच. तिला एकदां वत्सराजाच्या स्वाधीन केली ह्मणजे आपण निश्चित व्हाल.

**धौम्य**—बरें पण युद्धचमत्कार पाहण्याकरितां मी मंदाक्षाला पाठविलें होतें तो अजून कां बरें येत नाहीं ?

**गालव**—गुरुजी, हा पहा मंदाक्ष आलाच. ( मंदाक्ष येतो. )

**धौम्य**—बाळा मंदाक्षा, तो विजयी वत्सराजा इकडेच येत आहेना ?

**मंदाक्ष**——गुरुजी, तो वत्सराजा विजयी होऊन विश्रांतीसाठीं राणी वासवदत्तेसह वृक्षछायेखाली बसला आहे आणखी लौकरच आपल्या दर्शनासाठीं येईल.

**गालव**——काय ह्मणतोस, राणी त्याच्या बरोबर आली

आहे ? गुरुजी पाहिलेंत कां ? आतां प्रियदर्शिकाताईची काय वाट होणार ?

**धौम्य**—मुलांनो तुह्मीं अगदीं भिऊं नका. त्याची सर्व कांहीं तजवीज मी करितों. बरें पण वत्सांनो, तो राजा फार श्रमला असेल या करितां आपण आपल्या वेदशाळे-समोर त्याची वाट पहात बसूं चला !

## साकी.

**नेत्र भरुनियां काधिं पाहिन मी आजि त्या शशिकुलदीपा ॥ उत्कंठित मन माझें झालें बघण्या वत्स सुभूपा ॥ राक्षस संहरिले ॥ तेणें विघ्न नष्ट झालें ॥ १ ॥**

[ जातात. ]

[ राजा, राणी, व यौगंधरायण प्रवेश करितात. ]

**राजा**—

## साकी.

निदाघ सरल्यावरि मेघोदकवृष्टि जशी पांथाला ॥ सुखकर होते तेवी देई छाया मज शांतीला ॥ सप्तपर्णतरुची । झाली जी बहु सौख्याची ॥ १ ॥

**राणी**—महाराज, आतां आपण बरीच विश्रांति

घेतली आहे. तर ज्या महर्षींच्या कामाकरितां आपण या तपोवनांत आलों त्यांचें पादवंदन करून पवित्र व्हावें अशी माझी फार उत्सुकता आहे.

**राजा**—देवी वासवदत्ते, दानवांचा रणांत संहार करून आज जो मला विजय मिळाला हा धौम्यमहर्षींचा प्रसाद हेंच खचित. त्या पुण्य मूर्तींच्या दर्शनास आतां जाऊं चला. यौगंधरायणा तूंही ऋषींचा प्रसाद घेण्याकरितां आमच्या बरोबर आश्रमांत चल.

**यौगंध०**—ठीक आहे. चलावें महराज.

**राणी**—महाराज, हें तपोवन केवळ ब्रह्मसुखाचें आगरच आहे. पहा.–

**पद**.—[ आम्र मंजिरी तुला. ] ही चाल.

**पशु पक्षी हे आनंदानें वास इथे करिती ॥**
**तरुवर कोमल लतिकासंगें संतोषें नांदती ॥**
**ऋषिजन ठायीं ठायीं बसुनी ब्रह्मसुखा सेविती ॥**
**वाटे सगळीं पापें अपुलीं धुवुनि पहा जाती ॥१॥**

**राजा**—म्हणुनच याला ब्रह्मारण्य ही यथायोग्य संज्ञा आहे. ( एकीकडे ) अरे पण हें काय ? माझा उजवा बाहु स्फुरण पावतो याचें काय कारण बरें ? हां. तसें तर नसेलना ? पण छेः ! माझें वेडें मन इष्टवस्तूचें चिंतन क-

ऊन संशयडोहांत उगीच बुडत आहे. त्यांतूनही येथें राणी बरोबर असल्यामुळें प्रियासंगमाची आशा अगदींच नको. ( उघड ) वासवदत्ते, हें पहा धौम्य महर्षी वेदशाळेसमोर आपली वाट पहात उभे राहिले आहेत. त्यांना अभिवादन करूं या. ( तसें करतात. )

**धौम्य**—( पाया पडल्यावर ) वत्सा, दीर्घायु हो. वत्से, पुत्रवती सौभाग्यवती भव,

**राजा**—( हातजोडून ) महाराज,

## साकी.

**या दासाला श्रेयस्कर जी आपण आज्ञा केली ॥**
**पौंडरीक मालेंपरि ती मी सादर स्वशिरीं धरिली ॥**
**राक्षस संहारिले ॥ आतां कांहिं न भय उरलें ॥ १ ॥**

**यौगंध०**—भगवन्, आपल्यां चरणाचा दास यौगंध प्रणाम करितो.

**धौम्य**—वत्सा, कल्याण असो. हे विजयी वत्सराजा,

पद—[ ब्राह्मण कन्या नव्हे ]

महाभाग तूं वसुंधरेचा स्वामि खरा शोभसी ॥
यशानें सकल भुवन व्यापिशी ॥ १ ॥
तपोवनांतिल वनदेवी या बघुनि महा तव जया ॥
करिती पुष्पवृष्टि पाहि या ॥ २ ॥

**किन्नरतरुणी तरुपत्रावरि हरिणमदें काढुनी ॥**
**गाती तव यशगीता वनीं ॥ ३ ॥**
**नारदवदनें ऐकुनि विजया स्वर्गी महेंद्र हि महा ॥**
**मोदें डुलत राहिला पहा ॥ ४ ॥**

**राजा**—भगवन् हा सगळा आपल्या चरणाचा प्रभाव.

**धौम्य**—गालवा, आश्रमांत जाऊन प्रियदर्शिकेला ह्मणावें कीं, मधुपर्काचें साहित्य व पादोदक घेऊन लवकर वेदशाळेंत ये. आज आपल्या घरीं थोर अतिथी आले आहेत.

**गालव**—जशी गुरुजींची आज्ञा. ( जातो. )

**राजा**— [ आपल्याशीं ] काय ? हें माझ्या अहोरात्रीं ध्यानापुढें असलेलें नांव कोणाचें असेल बरें ? त्यांतूनही या शुभशकुना वरून माझा असा तर्क होतो कीं,

**पद**— [ साध्य नसे मुनि ] ही चाल.

**या मुनिच्याच दयेनें ॥ माझें दुर्दैव जणूं सरलें जाणें ॥ ध्रु० ॥ मम हृदयाची प्रियकारिणी ती ॥ येथें कैशी आश्रमिं येती । काय असें नकळे तें ॥ मन हें उत्कंठेनें उडतें ॥ १ ॥**

**राणी**—( आपल्याशीं ) अगबाई ! हें माझ्या कर्णाला वज्रासारखें पीडा देणारें नांव इथे कुठून आलें ? कदाचित् त्या नांवाची या महर्षींची कन्या तर नसेलना ?

**धौम्य**—महाभागा, वेदशाळेंत चलावें. (सर्व जातात.)

( प्रियदर्शिका व पत्रलेखा येतात. )

**प्रिय०**—

पद–( सखयांनो दाखवा गे. ) ही चाल.

**जिवलग तो भेटवी गे ॥ मजसि सखे या क्षणा ॥**
**चाल ॥ करुं गडे काय मी तरी ॥ झालें बावरी ॥**
**मजसि अंतरीं धीर धरवेना॥दाखवि त्या मोहना ॥१॥**

पत्रलेखे, गालव तर ह्मणतो कीं त्या कालस्वरूपिणी राणी-सह तिकडची स्वारी आली आहे, आणि माझा तर बाई आज डावा डोळा लवतो आहे !

**पत्र०**—गडे, तूं अशी घावरी होऊं नकोस. तुम्हा उभयतांच्या भेटीची धौम्य बाबानीं अगोदरच तयारी करून ठेविली असेल.

**प्रिय०**—पत्रलेखे, जिनें माझ्या सर्वस्वी सौख्याचा नाश केला त्या राणी पुढें मी उभी तरी कशी राहूं ?

( अश्रु गाळते. )

**पत्र०**—अहाग वेडे ! कितीतरी भिशील !! धौम्य बाबा किं नाहीं तुझे भक्कम पाठराखी आहेत. चल तर लवकर, बाबा वेदशाळेंत वाट पहात बसले असतील.

(राजा, धौम्य वगैरे वेदशाळेंत बसले असतांपडदा उघडतो.)

प्रिय०—( पुढें होऊन व राजाकडे न्याहाळून पाहून.)

पद—[ होवे भला ] ही चाल.

हीच खरी मूर्ति तरी ॥ आजवरी मी अंतरी ॥ सांठविली ॥ तीच आली ॥ मजसि तारायाला ॥ ध्रु० ॥ १ ॥

रोमांचिता होई तनू ॥ थर थर थर थर थर थर थर थर थर थर ॥ १ ॥ वाटें मना ॥ या मोहना ॥ आलिंगना द्यावेंचना सुरवरहरिनंदनसम सुंदर हा नाथ ॥ २ ॥

राजा—( आपल्याशीं ) वाहवा, धन्य मी हीच ती चारुगात्री.—अरेपण, ही विरहानें अगदीं ओळखूं येत नाहीं ! पहा हिची काय अवस्था झाली आहे !

पद.—( घनश्याम सुंदरा ) ही चाल.

मूर्तिमती जणुं विरहव्यथा ही दिसते या काळीं ॥ मृणालिकेपरि तनुलतिका किति विरहें तरि सुकली ॥ स्कंधदेश किति गळोनि गेले पांडुरता आली ॥ उज्वल प्रीती माझें ठायीं लाडकिनें राखिली ॥ हृदयीं सखिच्या कठोर शल्यें मदनाची

रुतली ॥ हंत कसा मी जिवंत आहे पाहुायां हिस असली ॥ १ ॥

( यौगंधरायण व पत्रलेखा एक मेकांकडे पाहून हंसतात व राणी प्रिय दर्शिकेला पाहून रागानें तोंड फिरवेत. )

धौम्य—वाहवा ! काय चमत्कार पहा !

पद—[ अभिनव मधुलोलुप० ] ही चाल

पद्मनिपीत रवि पुनरपि उदय पावला ॥
म्हणुनि पहा तीस किती हर्ष जाहला ॥ ध्रु० ॥
तत्सपत्नि भानुमती । द्वेष तिचा करि चित्तीं ॥
पाहुनियां उभयप्रीति ॥ सहन तिला नच होती ॥
म्हणुनि तिनें वदनशशी उलट फिरविला ॥ १ ॥

( आसनावरून उठून वासवदत्तेजवळ जातो. )

वत्से, वासवदत्ते, काय हा तुझा वेडपणा? प्रियदर्शिके विषयीं तुझा मत्सरभाव अगदीं वृथा आहे. अग ! वत्साला तूं व प्रियदर्शिका ह्या दोघी कुलपत्नी असाव्यात असा त्या विधात्याचाच मूळ संकल्प. त्याला तूं आड कशी जाणार? त्यातून वत्से, ही प्रियदर्शिका कोण हें तरी तूं नीट ओळखलेंस कां? ( राणी साशंकमुद्रेनें प्रियदर्शिकेकडे टक लावून पहाते. ) अग, तुझी प्रिय माता पद्मावती तिच्याच प्रत्यक्ष भगिनीची कन्या ही प्रियदर्शिका ! तर आ-

पल्या मावसबहिणीवरचा वैरभाव सोडून तिला कडकडून भेट पाहू?

प्रिय०—अग बाई! माझी मावशी पद्मावती तिची ही एकूण मुलगी तर! लहानपणापासून मी हिला न पाहिल्यामुळें आज पर्यंत मी हिला अगदींच परकी समजत होतें.

राणी—हरहर, समजलें! जिच्याशीं मी आजपर्यंत वैर धरिलें, ती ही प्रियदर्शिका माझी मावस बहीण असून, ही आमच्या महाराजांनाच मिळावी असा ब्रह्मदेवाचा संकल्प. तर मी पापिणीनें हिच्याशीं वैर धरून ब्रह्मदेव, ऋषिजन व माता यानां व्यर्थ शिणविलें. [ पुढें होऊन ] गडे, प्रियदर्शिके ये ये मला कडकडून भेटूंदे. [ उभयतां भेटतात. ] मी पापिणीनें तुला आजपर्यंत न ओंळखता व्यर्थ गांजलें, तर आतां सर्वकांहीं मागचें विसर.

पद. [ अजि शेवटचा ] ही चाल.

**बहु भाग्याचा दिन हा भगिनी अजिचा ॥**
**आपुल्या या भेटीचा ॥**
**अपराधी मी भगिनी तव गे साची ॥**
**क्षमा करी मज त्याची ॥**

प्रिय०—

**॥ चाल ॥ सोडुनियां सकलहि रागा ॥**

मजवरि गे करि अनुरागा ॥
॥ चाल ॥ हा दोष असे सगळा मम पापिणिचा ॥
भगिनी नच कोणाचा ॥ १ ॥

वासवदत्ता ताई सध्यां मला किती तरी आनंद झाला सांगू ?

पद. ( मज बोध करी ) ही चाल.

मज पावलि ती खचित अतां त्रिपुरसुंदरी ॥
कोप अतां ठेवुं नको भगिनि अंतरीं ॥ ध्रु० ॥
स्त्रीस्वभाव जन्मतां असेच मत्सरी ॥
तदनुरूप कोपलीस भगिनि मजवरी ॥
सोडिलेंस जरि तुं मला घोर कंदरीं ॥
राहुं आतां मिळुनि सुखें राजमंदिरीं ॥ १ ॥

धौम्य—वाहवा! या सागरगामीनी यमुना व भागीरथी आपण होऊनच एकमेकीला भेटल्या येणें करून फार आनंद होतो.

राजा—काय तरी माझ्या या दैवाचा खेळ चालला आहे पहा.

पद ( सुविहित जाहलें ) ही चाल.

सुलभचि जुळला योग पहा हा ॥
अति सुखद कसा या समयाला ॥ ध्रु० ॥
बहुत छळुनियां मम दैवानें ॥
आनंदाचा कळसचि केला ॥ १ ॥

धौम्य---हे राजा, तूं माझ्यावर फार मोठा उपकार केला आहेस. तर त्याबद्दल हा प्रसाद आज मी तुला अर्पण करतों. ( प्रियदर्शीकेचा हात घेऊन राजाच्या हातांत घालतो )

पद.—[ सुखचित् घन गुण. ] ही चाल.

**पूर्वप्रेम जिचें तुजवरती त्या या प्रिय मम दुहितेला ॥**

**मम हस्तें स्वीकारुनि सांप्रत ऋणमुक्त करीं मज भूपाला ॥**

[ नंतर वासवदत्तेचा हात त्याचें हातीं देऊन ]

**कविकन्या शर्मिष्ठा जैशा भार्या दोन ययाति नृपाला ॥**

**त्यापरि या दोघींचा संगम देवो तुजला मंगल माला ॥ १ ॥**

[ सर्व जण खालीं वाकून अभिवादन करितात. ]

राजा—-

पद. [ निजरूप हिला ] ही चाल.

बहु आनंदें मी स्वीकारी ॥ बहु० ॥ ध्रु० ॥
प्रसाद आपुला अति पावन हा ।
होय बहुत मज सुखकारी ॥ बहु० ॥

पत्र०—सखे प्रियदर्शिके आतां तरी मनासारखं

झालं ना ? आतां या गरीब मैत्रिणीशी धड बोलशील तरी कां ?

**प्रिय०**—पत्रलेखे, आतां माझी किती तरी थट्टा करशील ? अग तूं माझी जी थट्टा करत्येस त्या तुझं वर्म काढल्यावर मात्र रागाऊ नकोस हो. अग, आह्माला न कळत चोरटेपणानं ज्याना तूं आपलंस करून घेतलंस व ज्यांच्या सहाय्यानं रथमाणसासुद्धां माझ्याकडे आलीस, तेच हे सेनापती, युद्धाचं खोटं निमित्त करून तुला भेटण्यासाठीं आले आहेत. पटली कां खूण ? बागेंत जी माझी थट्टा केली होतीस ती मी अजून विसरलें नाहीं हो ! ठीक आहे मी बाबाना आता सांगते बरं !

[ **प्रीय०** धौम्यऋषीच्या कानांत सांगते व पत्र० लज्जान खाली पहाते. ]

**धौम्य**—( हर्षानें ) वाहवा ! आजचा हा सर्वच कपिलाषष्ठीचा योग दिसतो. यौगंधरायणा—

पद—( रामराज्या सुमुहूर्त ) ही चाल.

**वत्सवराजाला साह्य रणिं करोनी ॥**<br>
**तुष्ट केलें तूं मजासि बहु श्रमोनी ॥**<br>
**ह्मणुनि अर्पित मी हीच पत्रलेखा ॥**<br>
**फार शोभे ही तुजसि कनकलेखा ॥ १ ॥**

[ असें ह्मणून पत्रलेखेचा हात त्याचे हातांत देतो. ]

यौगंध०—

## साकी—

कल्पतरू सम सकल मनोरथपूरक आपण लोकां ॥
भगवन् अपुला प्रभाव साऱ्या विदितचि या भूलोकां ॥
प्रसाद हा अपुला । शिरसामान्य पहा केला ॥ १ ॥

[ असें ह्मणून खाली वाकून पत्रलेखेचा हात सोडतो. ]

धौम्य—[ प्रियदर्शिकेस ] बाळे, ये आतां मला एखदां आलिंगन दे.

प्रिय०—[ दुःखानें ]

पद—[ मारदियोरे पीया] ही चाल.

फार दिले हो ॥ बाबा ॥ फार दिले हो ॥ या पापिणिनें कष्ट तुम्हां फार दिले हो ॥१ ॥ पाहुं कधीं मी ॥ बाबा ॥ पाहुं कधीं मी ॥ हे पूज्य चरण नयनिं पुन्हा पाहुं कधीं हो ॥ २ ॥ जाऊं कशी हो बाबा ॥ जाऊं कशी हो ॥ हा प्रेमपाश तोडुनियां जाऊं कशी हो ॥ ३ ॥

धौम्य—

पद--( माड )

जा निज पतिसद्नाला ॥ बाळे ॥ ध्रु० ॥

इंद्र जसा पति शोभे शचिला ॥
ययाति नृप वा शर्मिष्ठेला ॥ १ ॥
दुष्यंत जसा शकुंतलेला ॥
वत्सराज हा तेंवी तुजला ॥ २ ॥

धौम्य व ऋषिकु०—राजा,

पद—( हो जानत प्रीत ) ही चाल.

तो मंगलधाम राम तुज पावो ॥ तो मंगलधाम० ॥ हे राजा, सुखभाजा प्रभु तूंते ॥ संतति संपत देवो ॥ तो० ॥ ध्रु० ॥ स्त्री विरही सुग्रीव समान तुझा विरहानल जावो ॥ प्रियकर सुंदरि संगम तुजला फार सुखावह होवो ॥ तो मंगल० ॥ १ ॥

धौम्य—राजा आतां काय तुझी आणखी इच्छा आहे?

राजा—आतां एवढेंच असो म्हणजे झालें.

पद—( धेनुपयोधा ) ही चाल.

नीतिमान नृप असुनि प्रजेला सुखदायक होवो ॥

धौम्य—

सुखदायक होवो. ॥

राजा—

विद्यालक्ष्मी यानिं भरतभूदैन्य दूर जावो ॥

धौम्य—

दैन्य दूर जावो. ॥

राजा—

सज्जनसंगम सदा घडोनी दुरित लया पावो ॥

धौम्य—

दुरित लया पावो ॥

राजा—

अनंतसुतकविकृति या जगतीं प्रिय सकलां होवो ॥ १ ॥

धौम्य—

प्रिय सकलां होवो ॥

( पडदा पडतो. )

---



## ॥ कोरस ॥

( जलसा कुच हासीका दिल ) हीचाल.

भो वंदन तव पायां, यदुराया, जितमाया,
कमलानिलया ॥ नवघनकाया, तारि अम्हां या,
भवसिंधूपासुनि वाया ॥ ध्रु० ॥ हे कंस-
शमन, धृतवंशवदन, अवतंसधरण, यदुवंश-
भरण, मुनिहंसशरण, विध्वंसकरी भवतापा या ॥
भो वंदन तव० ॥ १ ॥ नवकुंजरमण, सुरपुंजशरण,
अतिमंजुहसन, श्रितमंजुलवन, अलिगुंजनयुत
मधुवंजुलकुंजीं कृतशय्या ॥ भो वंदन० ॥ २ ॥
हे इंदुवदन, अरविंदनयन, नवकुंदरदन, अतिमंद-
हसन ॥ सुपुलिंदरमण, व्रजवृंदावनगोपीराया ॥
भो वंदन तव पाया ॥ ३ ॥ श्रीकांत, अससि
तूं क्षांत, हरुनि मम ध्वांत, करी शांतांत, बघुं
नको अंत, अतां कवि दत्तात्रय निजपदिं
न्याया ॥ भो वंदन ॥ ४ ॥

( होवे भला क्युं कर ) ही चाल.

॥ गौरी हरा । श्रीशंकरा । शेषधरा । चंडीश्वरा ॥
या पामरा । दे आसरा । चराणिं दत्तात्रया ॥ गाऊं
सदा । शंभूपदा । हर हर हर हर हर हर हर हर
हर हर ॥ १ ॥

---

( समाप्त. )